


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एफ १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६ / फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह.

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरसना मेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक ४. एप्रिल, सन १८८१. अंक ४.

हें मासिक पुस्तक
पुणें पेठ बुधवार येथें
भाऊ गोविंद सापकर यांचे ज्ञानचक्षु छापखान्यांत
छापून प्रसिद्ध केलें.

किंमत ८ आणे.

अनुक्रमणिका

# सूचना.

संग्रहाचे आश्रयदात्यांस अशी विनती आहे कीं ज्यांजकडे मागील सालची किंवा सालाची बाकी अद्याप देणें आहे ती त्यांणीं कृपा करून पाठवावी. गेल्या डिसेंबर मध्यें त्यांजकडे बिलें पाठविण्यांत आलीं आहेतच. पुनः पुनः बिलें पाठवून वर्गणीदारांस नाखुष करण्याची आमची इच्छा बिलकूल नाहीं. या गोष्टीकडे लक्ष देऊन वरील विनंतीचा निकाल करण्याची ते कृपा करतील अशी प्रार्थना आहे. चालू सालाचे देखील तीन महिने होऊन गेले व हा एप्रिल महिन्याचा अंक आज पावला, ह्या गोष्टीकडेही आमचे सुज्ञ वर्गणीदार कृपा करून लक्ष देतील. अंक वेळचे वेळेवर निघणें हें सर्वथा आश्रयदात्यां कडेसच आहे असें ह्मटलें तरी चालेल. **का० सं० व्यवस्थापक.**

# जाहिरात.

**श्रीकालीदास** कविकृत **पुष्पबाणविलास** नामक संस्कृत काव्य व त्याचें मराठींत पद्यात्मक भाषांतर **बळवंतराव कळ्ळाकर सिरस्तेदार दरबार अलीराजपूर** याणीं केलें तें विक्रीस तयार आहे. किंमत ०१॥ टपाल हंशिल ०॥. पुस्तकें **काव्येतिहास-संग्रह** कचेरींत विकत मिळतील.

## पोंच.

### सन १८८०।८१

| | |
|---|---|
| मि० ह० रा० चिपळुणकर | ४ |
| ,, रा० धों० खानोलकर | ४०६ |
| रा० रा० रा० के० लिमये | ४ |
| ,, ,, से० ने० ला० वसई | ४०६ |
| ,, ,, त्रिं० के० परचुरे | ४०६ |
| ,, ,, ग० आ० खाडीलकर | ४०६ |
| ,, ,, त्रिं० ये० देशपांडये | ४ |
| ,, ,, रा० प्र० जोशी | ४०६ |
| , ,, से० ने० इचलकरंजी | ४०६ |
| ,, ,, बा० वि० खारकर | ४ |
| ,, ,, वि० र० नातु | ४०६ |
| ,, ,, गो० के० पिटके | ८०१२ |
| ,, ,, ना० गो० पारनेरकर | ४०६ |

## विषयक्रम.

बखरी.



मराठी कविता.



संस्कृतकाव्यें.

आणि पत्र लिहिलें जे "हीं पदकें साहेबां योग्य जाणोन हुजूर पाठविलीं आहेत. वरकड चीजबस्त परशरामीं पावती करून पावती घेऊन पाठविली आहे. पावती व पदकें येतांच खान यांणीं स्वामींचे पुढें येऊन, तकसीर माफ होणें ह्मणोन अर्ज केला. त्याजवर स्वामी याणीं तीं पदकें याकुदखानास देवाचीं पदकें सिद्दी सात याणें काढून नेऊन उपभोगार्थ ठेविलीं, तीं देवाचे कार्याचीं नाहींत तुह्मीं आपले पुत्रांस देणें" ह्मणोन सांगोन निरोप घेऊन निघाले. याकुदखान पाय उतारा समागमें तरी पर्यंत येऊन, तकसीर माफ करून तकियां[५१] न सोडावा हेच विनंती वारंवार करून आज्ञा घेऊन माघारे गेले.

श्रीस्वामी परशुरामास आले. शामल[५२] दुष्टबुद्धी बेइमान हें चित्तांत आणून सन [५३]समानअशरीनामध्यें मार्गशीर्ष मासीं आगोदर श्रीदेवाची वस्तवानी वगैरे होतें तें किल्ले रसालगड * येथें नेऊन ठेविलें. उपरांत कारकून मंडळी कबिले[५४] सुद्धां स्वामींनीं धावडसीस रवाना केली. आपण सडे मागें परशुरामीं राहिले. कारकुनांचे कबिले हबसी यासि बातमी कळेल ह्मणोन उत्तर रात्रीस परशुरामाहून बाहेर काढून चिमणाजीपंताचे पुत्र जगन्नाथपंत साहा सात वर्षांचे स्वामींनीं आपले खांद्यावरून अर्धकोश पर्यंत परशुरामा पासोन आणून मार्गस्त करून माघारे गेले. धावडसी मध्यें चौसोपी वाडा बांधून दिला. त्यांत चिमणाजीपंत व बापूजीपंत व धोंडोपंत त्रिवर्गांस ठेविलें. अंताजी नारायण यासि वीरमाडे अनेवाडी येथील देखरेख सांगितली. गांवगन्ना कारकून देखरेखीस ठेविले. त्याणीं गांवावर जिकडील रोखे ‡ होते तिकडे जाऊन मनाचिठी[५५] आणावी. रखवाली करावी. वरकड कामकाज गांवचे हिशेब चौकशी खंडणी करणें व § अखत्यारी त्रिवर्गांकडे. श्रीस्वामी मागाहून धावडसीस येऊन सर्व बंदोबस्त करून धावडसीचे तळ्याचें काम लाविलें. श्रावणमासीं समाधीस परशुरामास जावें याप्रमाणें कांहीं दिवस चालिलें.

पुढें सन [५६]इसन्नेसल्लासीनां नंतर साल्गड प्रांतें सन सल्लास सलासिनां[५७]मध्यें श्रीनिवास परशराम प्रतिनिधी फौजसुद्धां पारघाट उतरून माहाड घेतलें. आणि

---

५१. तकिया = स्थान, ठिकाण (फकीर, योगी यांचें.)

५२. शामल = यवन.

५३. समान अशरीन = ११२८ = इ० स० १७२७.

* 'सोनगड' कोल्हापुर प्रतीचा पाठ. ह्या प्रतीची हकीगत पुढें येईल.

५४. काबला = कुटुंब, बायका

‡ 'जिकडील होतिल तिकडे जाऊन' को. प्र.

५५. मना चिठी = अवरोधपत्र, ज्यांचे रोखे त्यांचा अंमल बंद करण्याविषयीं लेख.

§ 'हा अकत्यार त्रिवर्गांकडे' को० प्र०

५६. इसन्ने सलासीन = ११३२ = इ० स० १७३१.

५७. सल्लास सल्लासीन = ११३३ इ० स० १७३२.

हबसी सिदीसात याचें पारपत्य करून अंजनवेल, गोवळकोट हस्तगत करावें ह्मणोन परशुरामीं येऊन मुक्काम करून राहिले. बाजीराव प्रधान व फत्तेसिंग भोंसले यांणीं राजपुरीवर मोहीम करून सन आर्बासलासिनांत रायगड घेतला.[58] राजपुरीचे लोकांचे काबिले धरून जेर करून घ्यावी तों फत्तेसिंग भोंसले आपलें निशाण चढवणार हें समजल्यानंतर पंतप्रधान यांणीं खंडणी घेऊन जंजिरा हबसी याजकडे राखिलें.[59] श्रीमंत राव प्रतिनिधी परशुरामास गेले.

श्रीस्वामी निघोन धावडशीस येऊन राहिले. गणेश बल्लाळ तांबे कारकून परशुरामीं देखरेखेस ठेविले. सलास सलासिना पासून श्रावण मासींची समाधी श्रीकृष्णातीरीं विरमाडें याचे रानांत मठ बांधून घेतला. तेथें सलास सलासीना मध्यें मौजे अनेवाडी व कसबे निंब यांत शिवेचा कज्या लागला. तेव्हां श्रीस्वामी अनेवाडीचे रानांत कृष्णातिरीं फत्तेबागांत निकर्ष[60] करून बसले. निंबकरांस थोरली देवडी विरुबाईची[61] हिमायतीमुळें अनेवाडीकर गरीब पाहून शींव रेटावी, हा मजकूर केला. श्रीस्वामींनीं निकर्ष करून शिंवेवर बसले. महाराज शाहू राजे यांणीं ऐकोन स्वामींचे दर्शनास फत्तेबागांत येऊन निंबकरांस नशद * करून पूर्वील शींव करार करून दिली. त्या शिंवेवरून स्वामींनीं आंब्याचीं झाडें लाविलीं. महाराजांनीं श्रीस्वामींस पालखी देऊन सन्मानें करून धावडशीस घेऊन आले. सन अर्बासलासिनामध्यें[62] मौजे माळशिरस प्रांत सुपें हा गांव दरोबस्त कुळबाब कुळकानु इनाम राजे छत्रपती यांणीं दिला. सन खमैस[63] सलासिनामध्यें महाराज महालसुद्धां[64] प्रतापगडास श्रीचे[65] दर्शनास गेले. येते समयीं धावड-

---

५८. प्रतिनिधि व भोंसले यांणीं रायगड १७३५ मध्यें घेतला व पेशव्यांनीं तळा घोसाळा वगैरे मुलुख घेऊन राजपुरीहून जंजिऱ्यावर मोरचे सुरू केले. ग्रां॰ ड॰

५९. ज्या ज्या वेळीं राजपुरी मराठ्यांच्या हातीं लागली त्या त्या वेळीं त्यांणीं तेथें मोरचे उभे करून जंजिऱ्यावर तोफा सुरू कराव्या. असा क्रम शिवाजी पासून चालला होता. पण त्यापासून तादृश उपयोग होत नाहीं हें पाहून व दुसरीकडे लक्ष देण्याचें जरूर आहे हें मनांत आणून बाजीरावानें तह केला. त्या तहानें ११ महाल व तळा घोसाळा, बिरवाडी, रायगड, अवचितगड हे किल्ले व महाड इतका मुलुख सिद्दी कडून मराठ्यांस मिळाला.

६०. निकर्ष=हटयोग, उग्रतप.

६१. विरूबाई=ही शाहूची ज्येष्ठ पत्नी असें वाटतें. हिमायत=फूस, पाठबळ, वशीला.

* "निषेध" को॰ प्र॰

६२. अर्बा सलासीन=११३४=इ॰ स॰ १७३३.

६३. खमस सलासीन=११३५=इ॰ स॰ १७३४.

६४. महाल=अंतःपुर. राणीवसा

६५. श्रीचे=देवीचे. तुळजा पुरची भवानी ही भोंसल्यांची कुलस्वामिणी. इणेंच शिवाजीस दृष्टांत दिल्यावरून त्याणें प्रतापगडावर तिची स्थापना केली. शिव छत्रपतीचें चरित्र पृ॰ २१ पहा.

शीस येऊन तीन दिवस मुक्काम करून राहिले. माळशिरस गांवचा इनामतीचा कागद हातरोखा शाहू महाराजांनीं करून दिला. छ २२ मोहरम सन तिसांसलीसिनांत[६६] महाराज छत्रपती महालसुद्धां मिरजेस मसलतीमुळें[६७] गेले. त्याच सालीं विरमाडेकर पाटील व अंताजी नारायण यांची कटकट होऊन विरमाडेकर महालांत वीरूबाईकडे फिर्याद जाहले. अंताजी नारायण गांवांत येऊन वगैरे लिहून घेतलें. श्रीस्वामी मिरजेस गेले. तेथून आल्या नंतर सन इहिदे अर्बैन[६८] ज्येष्ठ वद्य ४ छ १७ शके १६६३ दुर्मती संवत्सरीं जमादिलावलीं चिमणाजी कृष्ण यास देवआज्ञा जाहली. तदनंतर सर्व कारभार जगन्नाथ चिमणाजी यासि स्वामींनीं सांगितला. आपण अगत्य अगत्य देखरेख करीत. मिरजेहून महाराज आलियावर सन इसनेअर्बैनांत पौषमासीं साहेब विरूबाई यांचा काळ जाहला. बाजीराव प्रधान यांचा काळ सन अर्बैन शके १६६२ रुद्रसंवत्सरीं वैशाख शुद्ध २ सि* जाहला. चिमणाजीआपा व बाळाजी बाजीराव सातारियासि महाराजांकडे आले. बाळाजी बाजीराव यांसि पेशवाईचीं वस्त्रें सन इहिदे अर्बैन भाद्रपदमास[ शके १६६२ ] जाहलीं. वस्त्रें जाहल्या नंतर आपा व नाना प्रधान धावडशीस स्वामींचे दर्शनास येऊन, प्रसाद वस्त्रें घेऊन, निरोप घेऊन गेले. श्रीस्वामींनीं जगन्नाथ चिमणाजी यांस पेशवे यांस सांगून किल्ले पुरंधर येथें पेशजी सनद दोनशें रुपयांची असामी करून दिली. सन इहिदे असैना [?] मध्यें जास्ती १०० रुपये तैनात करार करून ऐन तीनशें रुपयांची असामी पुरंधरीं दिली व सन मजकुरीं यशवंतराव पवार यांजकडे दीडशें रुपयांची असामी करून जगन्नाथपंतास दिली.

नंतर बावांचे आज्ञे प्रमाणें जगन्नाथ चिमणाजी कारभार करूं लागले. श्रीस्वामींचा काल पुढें होणार तों अगोदर आठ नऊ महिने भविष्य स्वामींस समजलें. तों एके दिवशीं शाहू महाराज श्रींचे दर्शनास आले. तों श्रीस्वामी धावडशीचे तळ्यावरील मठांत जप करीत बसले होते. तों शाहूराजे दर्शनास आले हें वर्तमान ऐकतांच स्वामी आसनावरून उठोन गुप्त जाहले. महाराज गांवांत येतांच जगन्नाथपंत पुढें जाऊन भेटले. महाराजांनीं जगन्नाथपंतास विचारलें स्वामी कोठें आहेत ? तेव्हां जगन्नाथपंतीं सांगितलें जे श्रीस्वामी मठांत तप करीत आहेत. त्याजवर महाराज व जगन्नाथपंत

---

६६. तिस्सां सल्लासीन = ११३९ = इ० स० १७४८.

६७. मसलत = राज्य कमाविण्याचा बेत, मोहीम. ही मसलत कोणती?

* 'द्वादशीस' को० प्र०

६८. इहिदे अर्बैनांत = ११४१ = १७४० इ० स०

स्वामींचे मठांत आले तों स्वामी मठांत नाहींत. आसन मात्र ठिकाणावर आहे. असें पाहून शाहू महाराज परम साशंक होऊन जगन्नाथपंतास बोलिले जे "स्वामी मठांत जप करीत आहेत असें तुह्मीं सांगितलें आणि स्वामी तों तेथें नाहींत याचा अर्थ काय? आह्मी स्वामींचे दर्शनास आलों आणि स्वामी दर्शन देत नाहीं हें काय?" तेव्हां जगन्नाथपंतीं विनंती केली जे, " मी आपल्याकडे आलों ते समयीं स्वामी मठांत जप करीत बसले होते, त्यावरून महाराजांस विनंती केली जे, स्वामी मठांत आहेत. आतां कोठें गेले समजलें नाहीं. शोध करितों." ह्मणोन जगन्नाथपंत मठा बाहेर येऊन बागांत व गांवांत शोध केला. परंतु कोठें शोध न लागे. तेव्हां माघारे येऊन महाराजांस विदित केलें. स्वामींचा शोध लागत नाहीं. तेव्हां राजे बहुत श्रमी खिन्न होऊन विचार करून सर्व मुत्सद्दी व सैन्यास आज्ञा केली जे, "स्वामींचे दर्शना कारितां आह्मी आलों आणि स्वामी दर्शन देत नाहींत त्यापेक्षां येथें आमचें राहावयाचें कारण काय?" असें बोलून भालदारास सांगोन संपूर्ण समागमी लोक सारे गांवाबाहेर लाविले. एक पालखी व दोन खिजमतगार आपणा जवळ ठेवून गांवांत एका कुणब्याचे घरीं गुप्तरूपें बसले आणि जगन्नाथपंतास बलावून सांगितलें. जे, "आह्मी गांवांतून गेलों असें कळल्या नंतर स्वामी मठांत येतील. ते बातमी तुह्मी राखून, स्वामीस भेटून, खुलासा चित्तांतील कसा काय हें समजोन आह्मांस येऊन सांगावें. आह्मी गावांत आहों असें स्वामीस कळूं न देणें. माघारे गेलों असें सांगावें." असें जगंनाथपंतास महाराजानीं सांगितलें. त्याजवर चार सहा घटिका जाहल्या नंतर स्वामी मठांत येऊन आसनावर बसले हे बातमी राखून जगंनाथपंतीं येऊन स्वामीस विनंती केली कीं, " राजे आपले दर्शनास आले होते. त्यांस दर्शन न द्यावयाचें कारण?" असें जगंनाथपंताचें वचन ऐकोन, स्वामी बहुत रोष करोन बोलिले जे, "राजा माझे भेटीस येतां नये." तेव्हां जगंनाथपंतीं विनंती केली जे, " असा राजेश्री पासून काय अपराध घडला आहे? [कीं] स्वामी त्यांस दर्शन देत नाहींत." त्यास स्वामी बोलिले जे, राजानें कोंकणांत धामवली गांव इनाम दिला तो तुळाजी आंग्रे यानें जप्त केला. त्याचें पारिपत्य राजा धनी होऊन कां करीत नाहीं? यास्तव राजास दर्शन द्यावयाचें नाहीं." तदनंतर जगंनाथपंतीं विनंती केली जे, " तुळाजी आंग्रे यांणें गांव जप्त केला तो राग स्वामीनीं राजेश्रीवर काढावा असें नाहीं. तुळाजी आंग्र्या प्रस्तुत धन्याशीं बदमस्त, महाराजानीं ताकीदपत्रें दिलीं असतां मानीत नाहीं. त्या पक्षीं स्वामीनीं राजेश्रीवर राग करूं नये. दर्शन

देऊन समाधान करावें." तेव्हां सुप्रसन्न होऊन स्वामी बोलिले जे, "राजा आहे किंवा माघारा गेला? असल्यास भेटीस घेऊन येणें." तेव्हां जगंनाथपंत बोलिले जे, "गांवाचे बाहेर गेले परंतु शोध करितां जवळ असल्यास घेऊन येतों. परंतु मी राजेश्रीकडे गेल्यानंतर पुन्हां स्वामी अदृश्य होऊन राजश्रीस दर्शन न दिल्यास मजकडे लटीवाद येईल. महाराजांचा शह्ब मजला लागेल. तेव्हां स्वामींनीं खातरजमेचें वचन दिलें ह्मणजे जातों." "शाहूस घेऊन येणें आह्मी कोठें जात नाहीं," असें स्वामीचें वचन घेऊन जगंनाथपंत राजेश्रीकडे गेले आणि वर्तमान सांगितलें कीं, स्वामींनीं आपणास दर्शनास बोलाविलें. तेव्हां महाराज परम समाधान पावोन श्रीस्वामींचे दर्शनास आले. श्रीवागजाईचे देवालया नजीक येऊन पालखींतून उतरोन चरणसंपुट काढून, अनवाणी बहुत अदबेनें हस्तयुगल जोडून जगंनाथपंत समागमें घेऊन श्रीस्वामींचे मठा सन्मुख आले. स्वामींची व राजेश्रींची दृष्टादृष्ट होतांच स्वामी आसनावर उभे राहिले. हें राजश्रींनीं पाहून आपण मठा बाहेर उभे राहिले. तेव्हां स्वामींनीं राजेश्रीस "मठांत या" ह्मणोन बोलिले त्याजवर महाराज स्वामींच्या आसना संनिध गेले. श्री स्वामी आसनावरून खालीं उतरून शाहूमहाराज यांस हातीं धरून आसनावर बसावयासि लागले. राजश्रीनें विनंती केली जे, "हे अमर्यादा मज पासून घडणार नाहीं. प्रथम मजला पाहून अभ्युत्थान दिले याचें कारण काय व आसनावर बसा ह्मणतात याचें कारण काय हें मजला समजलें पाहिजे." तेव्हां स्वामी बोलिले जे "याचें कारण कांहीं असेंच आहे. तुह्मी स्वस्त बसावें ह्मणजे सांगतों." त्याजवर राजश्री स्वामींनें आसन सोडून पहिल्या चाली प्रमाणें भुमीवर बसोन मागती स्वामीस पृच्छा केली जे, "आज पर्यंत स्वामींनीं उथ्थापन मजला दिलें नाहीं आणि आज द्यावयाचें कारण काय?" स्वामी बोलिले जे, याचें कारण आज पर्यंत आह्मी निस्पृह होतों आतां आह्मास कुटुंब लेकरें जाहलीं. तुमची स्त्री सगुणाबाई यांस आपली कन्या ऐसें ह्मणाविलें तेव्हां तुह्मी आमचे जांवई जाहालां तुमचा आदरमान अभ्युत्थान न करावें तरि आमचे लेकीस सासुरवास होईल. या कारणास्तव तुमचा सन्मान करणें प्राप्त आहे." राजे बोलिले जे, "बाबा, आपण कसें ह्मणता? परंतु प्राचीन आमची चाल आहे तीं खरी" ऐसा क्षणेक उभय पक्षीं विनोद जाहलिया नंतर मागती राजश्रींनीं पृच्छा स्वामींस केली जे, "स्वामींचे दर्शनाची इच्छा धरून दर्शनास आलों तों स्वामी अदृश्य होऊन दर्शन न दिलें याचें कारण काय?" स्वामींनीं उत्तर दिलें जे "कोंकण प्रांताचे गांवचीं इनामपत्रें तूं करून दिलींस आणि तु-

ळाजी आंग्र्या गांव चालवीत नाहीं. याचें पारपत्य करीत नाहींस तेव्हां तूं धनी कशाचा, तो चाकर कशाचा?" असें स्वामींचें वचन ऐकोन राजश्री बोलिले "बावा, आंगऱ्या चाकर आमचा परंतु शिष्या कोणाचा?" तेव्हां स्वामी बोलिले जे, "शिष्य मातला." राजे बोलिले "चाकरही मातला, येविशींचा राग स्वामींनीं चित्तांत न आणावा. पर्यायें करून त्याचें पारिपत्यही होईल. व स्वामींचे गांवही चालतील." ऐसें उभय पक्षीं संतोषाचें बोलणें जाहलियानंतर क्षणेकानें श्री स्वामींनीं राजेश्रीस आज्ञा केली जे, "शाहू, तुजला दोन गोष्टी पुसावयाच्या आहेत." असें स्वामींचें वचन ऐकोन राजश्री क्षणेक स्तब्ध राहिले. तेव्हां स्वामी बोलिले जे, "शाहू, उगाच कां राहिलास? तुजपाशीं कांहीं गांव दौलत मागत नाहीं. श्रीकृपेकरून सर्व अनकूल आहे. पुढील कांहीं दोन गोष्टी तुजला विचारतों त्यास उत्तर सांग." तेव्हां महाराज बोलिले जे, "आज्ञा करावी." उपरांत स्वामी बोलिले जे, "मजमागें माझें संस्थानास धनी कोण?" तेव्हां राजश्री बोलिले जे, "आज हे गोष्ट पुसावयाचें कारण काय?" स्वामी बोलिले जे, "मोठे मोठे पूर्वी अवतार व पांडवादिक राजे जहाले ते कोठें आहेत? आमची तों मानवी [काया] शरीर क्षणभंगुर. यास्तव पुसावयाचें कारण." येणें प्रमाणें स्वामींचें वचन श्रवण करून शाहू महाराज बोलिले, "स्वामींचे मागें संस्थानचा धनी मी" ह्मणोन आपले हृदयावर हस्त ठेविला. तत्समयीं श्री स्वामी बहुत संतोष पावोन जगंनाथपंत जवळ होते त्यांचा हात स्वामींनीं धरून महाराजांचे हातीं दिला. आणि सांगितलें जे, "आज पर्यंत चिमणाजी पंतापासून पुत्रवत् याचें पालन केलें. आतां धनी तूं. मजपेक्षां विशेष याचें चालवावें." ह्मणोन स्वामी बोलिले. महाराजांनीं उत्तर केलें, "माझा जीव आहे तों पर्यंत अंतर करणार नाहीं. पुढील प्रकार स्वामींस विदित आहे." जगंनाथपंतास स्वामींनीं आज्ञा केली जे, "आज पर्यंत तुमचें मी पालन केलें. या उपरि धनी तुमचा शाहू. बरें वाईट पुसणें तें यांस पुसत जावें. एक निष्ठेनें तुह्मीं माझी सेवा केली तिचा उतराई मी आज जाहलों." असें बोलोन जगंनाथपंताचा हात महाराजांचे हातीं दिला. उपरांत स्वामी महाराजांस बोलिले जे, "एक गोष्ट जहाली. दुसरी एक गोष्ट विचारावयाची." राजे बोलिले, "आज्ञा करावी." तेव्हा श्रीस्वामी बोलिले, "माझें देहावसान जाहलिया नंतर माझें कलेवर कोठें ठेविसील?" तेव्हां महाराज बोलिले, "हे गोष्ट स्वामींनीं विचारूं नये, आह्मी सांगों नये, याचें कारण आज नाहीं." स्वामी बोलिले, "क्षण-वि-

ध्वंसिनी काया, या उपरि तुझें आमचें बोलणें होणें ईश्वरी इच्छा." तेव्हां महाराज बोलिले "स्वामींचा हेतु कोणे स्थलीं आहे?" स्वामी बोलिले जे, "माळशिरसगांव तूं श्रीस दिला आहे. तेथें श्री भुलेश्वर देव. जागा फार रमणीक चांगली आहे. तुझे विचारास आल्यास समाधीचें स्थान ही मीं बांधून ठेविलें आहे." असें स्वामींचें वाक्य ऐकोन महाराज बोलिलें "स्वामी अशी गोष्ट आधीं होणार नाहीं. जाहली तरि धावडशींत या मठांत या जाग्यावर स्वामींस ठेवीन." असें महाराज बोलतांच श्रीस्वामींनीं उत्तर केलें जें, "उत्तम आहे. मजमागें संस्थानाचा धनी तूं. तुझे विचारास येईल त्या प्रमाणें करावें." या प्रमाणें स्वामींचें व महाराजाचें बोलणें बहुत संतोषयुक्त जाहलें. त्या उपरि महाराजांस श्रीस्वामी बोलिले जे, "शाहू, तूं आज फार श्रमी जाहलास. तुजला शिकार आज सांपडली नाहीं. तरि श्री तुजला शिकार येथेंच देईल. आधीं भोजन करावें." जगंनाथपंतास आज्ञा केली जे, "शाहूस वाड्यांत नेऊन भोजन घालावें."

या उपरि महाराज वाड्यांत येऊन भोजनास बसले तों अकस्मात् श्रीस्वामींचे मठा नजीक तळ्यांत अरण्यांतून मोठा सांब्रर येऊन उडी घातली. हें स्वामींनीं पाहून महाराज राजे यांस सांगोन पाठविलें जे, "तुजला देवानें शिकार येथेंच दिली. सत्वर येणें." ऐसा स्वामींचा निरोप येतांच भोजन पात्र तसेंच टाकून श्रीचे मठा नजीक तळ्यावर आले, तों सांबर तळ्यांत पोहत आहे. असें महाराजांनीं पाहून मोठा चमत्कार मानून तळ्या भोंवतीं चौकीदार उभे करून आज्ञा केली जे, "स्वामींनीं शिकार दिली आहे हा सांबर कोणी मारूं नये, हत्यार चालवूं नये." ऐसी आज्ञा होतांच लोकांनीं उड्या घालोन सांबर जिवंत धरून बाहेर काढिला. महाराजा समीप येऊन गांवांतील बाजलीं आणोन त्याजवर सांब्रर घालोन शेळे पागोटीं याणीं बांधून ठेविला. चराटांनीं बांधिल्यास नेते समयीं सांब्राची त्वचा घांसेल, श्रमी होईल. या अर्थी पागोटीं याणीं बांधिला. या उपरि श्री स्वामी समीप महाराज येऊन बहुत चमत्कार वर्णून सातारियास जाण्याची आज्ञा मागितली. श्री स्वामींनीं जगंनाथ पंतास आज्ञा केली कीं, "राजे यांस प्रसादवस्त्रें द्यावयाचीं घेऊन येणें." आज्ञे प्रमाणें वस्त्रें जगंनाथपंतीं आणिलीं. आणि स्वामींचे पुढें ठेविलीं. स्वामींनीं पागोटें ब्र्हाणपुरी लहरीदार[६१] हिरवें याचा पदर हातीं घेऊन महाराजांचे हातीं दिला. राजेश्रींनीं पदर घेऊन दोन तीन वेढे मस्तकीं बांधिले. नंतर महाराज चित्तांत परम साशंक होऊन डोईचें

६१ लहरीदार=छानदार, झगझगीत.

तिवँट तसेंच काढून ठेविलें आणि स्वामींस बोलिले जे "मजपासून मोठी चूक जाहली." स्वामी बोलिले जे, काय चूक जाहली ? राजे बोलिले जे, पूर्वी सांप्रदाय आमचा ऐसा आहे जे आधीं स्वामींचें आंग पुसावयाचें आंगवस्त्र मागोन घ्यावयाचें, उपरांत प्रासादिक वस्त्र आधीं स्वामींनीं आपले मस्तकीं बांधून आमचे मस्तकीं घालावें. ऐसा आज पर्यंत सांप्रदाय चालला. त्यास अंतर पडलें." असें ह्मणोन महाराजांनीं जगंनाथपंतास सांगितलें, दुसरें तिवट घेऊन येंणें. दुसरें तिवट पोशाखी समीप नव्हतें यामुळें जगंनाथपंत उगेच राहिले. महाराजांनीं अर्थ समजोन सांगितलें जें, "जसें तिवट असेल तसें तीरूपयाचे किंमतीचें घेऊन येणें. आह्मांस स्वामींचा प्रसाद घेणें, किंमतीवर नजर नाहीं." तेव्हां जगंनाथपंती स्वामींची आज्ञा घेऊन दुसरें तिवट आणिलें. महाराजांनीं अगोदर श्रींचें आंगवस्त्र मागोन घेऊन तिवटाचा पदर स्वामींचे हातीं दिला. स्वामींनीं आपले मस्तकीं बांधून राजेश्रीचे मस्तकीं घातलें. महाराजानीं स्वामीस वंदन करून आज्ञा घेऊन समागमें सांबर घेऊन सातारियास गेले. पहिल्यानें ब्रह्माणपुरी पागोटें बांधलें होतें तें ही स्वामी जवळ मागितलें जे, हें ही प्रसादिक धणीस चोळ्यां करितां द्यावें. तें ही घेऊन सातारि यास गेले. आधीं धाकटी धणीन सौभाग्यवती सगुणाबाई यांचे वाड्यांत महाराज जाऊन शिकार सांबर स्वामींनीं दिला तो दाखविला. व स्वामींचें आपलें भाषण जाहलें तितकें धणीस सविस्तर सांगितलें. स्वामींची तब्येत फिरली ह्मणोन धनीस सांगितलें. त्यावरून सौभाग्यवती सगुणाबाई फारच श्रमी होऊन महाजारांस विनंती केली जे, "मजला आज्ञा होईल तरि स्वामींचे दर्शनास धावडशीस जाऊन येईन." महाराजानीं आज्ञा केली जे, "महिना पंधरा दिवशीं जावें. आजच जावें असें कारण नाहीं." या उपरि फाल्गुन मासीं सन खंमस अरबैनांत धाकटी धनीण सौभाग्यवती सगुणाबाई श्रींचे दर्शनास धावडशीस आली. त्यांजलाही स्वामींनीं पुढें संस्थान चालावें ये विषयीं निर्वणूक करून जगन्नाथपंत हातीं दिले. तदनंतर बाईस प्रसाद वस्त्रें देऊन निरोप दिला. त्याजवर आषाढमासीं सौभाग्यवती सगुणाबाईसाहेब यांणीं यमाजी शिवदेव प्रतिनिधीचे मुतालीक यांस बोलावून आज्ञा केली जे, "यंदा श्रीस्वामींचें शरीर बहुत क्षीण जाहलें आहे. भाषणही उदासीनतेचें दिसतें. श्रावणमास जवळ आला. कृष्णातिरीं जाऊन समाधीस बसावयाचें स्वामींचें वार्षिक आहे. त्यास तुह्मी धावडशीस जाऊन माझी विनंती सांगावी जे, यंदा समाधीस बसणें तें धाव-

७० तिवट = पागोटें.

४०. किरा, असामी एक मयत.

४०. किरा; असामी एक ऐसकत **इमामुदीन माजुल** जमादार याचा चिरंजीव वडील **यलोन्नुदीन**.

४८० चारशें ऐशीं एकंदर.

१०० वकील असाम्या चार दरमहा रुपये २५.

४०५० स्वार असामी १९८ दर असामी रुपये २५.

१५ लवस[3] तुरमची असामी ३ दर ५ रुपये प्रमाणें.

५९९५ एकंदर.

[२५]　　　**श्री**

कलमबंदी याद, राजश्री **पंतप्रधान** यासीं व राजश्री **मुधोजी सेनाधुरंधर** यासीं करारमदार, राजश्री **सेनासाहेबसुभा** यांजकडील, ठरण्यांत आले छ० १ माहे जिलकाद सु॥ सीन समानीन मया व आलफ सन ११९५ फसली मुक्काम पुणे.

सवाल १–पूर्वी चिरंजीव राजश्री **रघोजी भोसले सेनासाहेबसुभा पुरंधरास** आपले भेटीस आले, त्या प्रसंगीं कितिएक प्रकारे स्नेहाचें व ऐक्यतेचें बोलणें झालें. व परस्परें स्नेहसंबंध दृढतर होऊन त्यांचे येणें पुन्हा **नागपुरास** घडलें. त्या नंतर **दिवाकर पुरुषो-**

---

२. बडतर्फ.

३. लवस तुरम ?

१. ह्या तहाविषयीं उल्लेख ग्रांटडफ यांच्या इंग्रजी इतिहासांत आढळतो. [तिसरी आवृत्ति पृ. ४६८ पहा] बदामीचा किल्ला सर करून चिमणाबापू सन १७८५ च्या अखेरीस परत आल्यावर, मुधोजी पुण्यास गेला होता तेव्हां ही कलमबंदी झाली असा एका ठिकाणीं बखरींत शेरा आहे. परंतु सन १७८६-८७ सालच्या मोहिमेंत बदामीचा किल्ला काबीज केला असें ग्रांट् डफ् लिहितो [पृ. ४६८–६९ इंग्रजी इतिहास] ही कलमबंदी सन १७८५ त झाली असें याच लेखांत आहे. यावरून एका वर्षाची तफावत पडते. बखरींतील मित्ती व ह्या लेखाची मित्ती ह्यांचा मेळ आहे. पूर्वोक्त चिमणाबापू हा मुधोजीचा मुलगा, याचें नांव खंडोजी उर्फ दाजी साहेब भोंसले असें होतें. हा मोठा पराक्रमी होता. "कर्नाटक बदामी घेतली चिमणाबापूनें" असें एका पोंवाड्यांत वर्णिलें आहे. हा सन १७८९ त मारला गेला.

२. सवाई माधवराव पेशवे.

३. साबाजीच्या मरणानंतर मुधोजीस 'सेनाधुरंधर' हा किताब मिळाला. सन १७७५ च्या जानेवारी महिन्यांत नागपुरानजीक दक्षिणेस पांचगांव या नांवाचें एक खेडें आहे तेथें साबाजी व मुधोजी यांचा युद्ध संग्राम झाला व त्यांत साबाजी मरण पावला. त्यानंतर 'सेनाधुरंधर' हें पद पावून मुधोजी रघोजीचा राज्य कारभार पाहूं लागला.

त्तम याचें येणें **पुण्यास** जाहलें; त्या प्रसंगीं **आंग्रेज** आदिकरून [ पर शत्रू विषयीं ] संशय निर्माण जाइले होते ते निरसन होऊन करार-मदाराचे प्रकार परस्परें *ठहरण्यांत आले. सांप्रत आमचें येणें आपले भेटी करितां जाहले तेव्हां या प्रसंगीं परस्परें सर्वोत्कर्षें निश्चयात्मक बोलणीं करारमदार ऐसा *ठहरावा, कीं याची बुनीयाद बहुत दिवस कायम राहे व कोणेही प्रसंगीं परस्परें दुसरा प्रकार नमुदीस न ये; वंशपरंपरा उपयोगा येई ऐसें जालें पाहिजे. कलम १.

जबाब—पूर्वी राजश्री **रघोजी भोसले सेनासाहेब सुभा** व **दिवाकर पुरुषोत्तम** भेटीस आले, ते प्रसंगीं बोलणीं जालीं, प्रस्तुत तुमचें येणें जालें. स्वच्छतेचीं बोलणीं जालीं; संशय राहिला नाहीं. तुह्मांकडून लिहिल्या प्रमाणें वर्तणूक घडावी, इकडूनही दुसरा प्रकार होणार नाहीं, खातरजमा असावी; येणें प्रमाणें करार करावे.

सवाल २.—चिरंजीव **सेनासाहेब सुभा** याचे नांवें सनदा ऐश्या कीं **मकसुदाबाद** व सुधे **पटणें**[a] व **कटक**[b] प्रांत **उडीसा**[c] बेमये **संबलपूर**[d] व प्रांत **छत्तीसगड**[e] व **छोटानागपूर**[f] व प्रांत **बस्तर**[g] वगैरे व प्रांत **वराड**[h] व संस्थान **देवगड**[j] व संस्थान **चंद्रपूर** बमेये **उठणूर** सुद्धां

---

* नागपुराकडील मंडळीच्या भाषणांत आणि लेखांत 'ठराव' 'मसलत' इत्यादि अनेक शब्दांत 'ह' ज्यास्त घातलेला आढळतो. नागपूर प्रांतीं उर्दू भाषेचा विशेष प्रचार असल्यामुळें त्या भाषेंतून मराठींत आलेले शब्द–मूळ जसे शब्द आहेत त्या प्रमाणेंच तिकडील लोक उच्चारतात, व आमच्या इकडच्या लोकांच्या रीति प्रमाणें अपभ्रष्ट उच्चार करीत नाहींत.

४. बुनियाद=बुन्याद=महत्त्व, जोर, अंमल, वजन.

५. उघाडकीस, दृष्टोत्पत्तीस.

६. लेख [३] पृष्ठ १६ टीप २ पहा.

७. पक्कीखात्री, परिपूर्ण विश्वास.

८. कटकत्यापासून ६० कोसांवर मकसुदाबाद आहे.

a. हें शहर औरंगाबादेहून नेऋत्य दिशेस १९ कोसांवर आहे.

b. हें शहर उडिसा प्रांतांत आहे.

c. ओरिसा प्रांत.

९. सह, सुद्धां.

d. छत्तिसगड किसमतींत 'संबलपूर' हा एक प्रस्तुत जिल्हा आहे. संबलपूर हें शहर जिल्ह्याचें व तहशिलीचें सदर ठिकाण आहे.

e. मध्यप्रदेशाची छत्तिसगड ही एक किसमत (भाग) आहे.

f. हा बहार प्रांतांतील एक जिल्हा यास छोटा असें ह्मणण्याचें कारण हा जिल्हा नागपुरकर भोंसल्यांच्या प्रांतापेक्षां फार लहान होता.

g. हें एका स्वतंत्र संस्थानिकाचें स्थान असून पूर्वी हें गोंडवनांत मोडत असे.

h. हा प्रांत प्रसिद्धच आहे.

j. देवगड हें छिंदवाड्याच्या नैऋत्येस १२ कोसांवर भर डोंगरांत आहे, पूर्वी येथें गोंडराजाची राजधानी असे.

अनुक्रमणिका

व प्रांत **बरघांट मुलतापी** वगैरे व प्रांत **गढेमंडले** येथील **रेवा** दक्षिणतीर दरोबस्त तालुका हे कैलासवासी **महाराजां**[१०] पासून चालत आहे त्याप्रमाणें हल्लीं दरोबस्त सनदा जाल्या पाहिजेत. कलम १.

जबाब—पेशजीं पासून आहे त्याप्रमाणें करार करून सदरहू प्रमाणें सनदा; येणें प्रमाणें करार करावे.

सवाल ३.—चिरंजीव **खंडोजी भोसले सेनाबहादर** यांस सरंजाम प्रांत **गढेमंडले रेवां**[११] उत्तरतीरचा दरोबस्त प्रांत व ठाणेंजात व गडजात सुद्धां देण्याचा करार कैलासवासी **दिवाकर पुरुषोत्तम** याचे विद्यमानें ठरला आहे त्याजप्रमाणें चिरंजीवां[१२]केडस संस्थान बहाल करून सनदा देविल्या पाहिजेत. कलम.

जबाब— येविषयींचे बोलणें होऊन आलाहिदा यादी ठरली आहे त्याप्रमाणें सनदा देवविल्या जातील; येणें प्रमाणें करार करावे.

सवाल ४—जाहागीरदाराचे [१३]हर्षामर्षामुळें **वऱ्हाडांत** व **गंगथडींत** कमती झाली. दिवसोनदिवस जागीरदार[१३a] भारी होत चाललेत; नबाबाचा स्नेह व इकडोल **ऑळजपूरचे**[१४] तहाप्रमाणें जागीरदारांनीं वर्तणूक करावी ऐसी नबाबाकडून निक्षून ताकीद असतां ते मानीत नाहींत, जमाव येऊन हिश्याचे कामांत खलेलें[१५] करितात येणें करून लाखों रुपयांची नुकसानी दिवसोन दिवस होत चालली; कथंचित जागीरदारासीं एखादा [१३]हर्षामर्ष झाला तेव्हां नवाबाचे मर्जीत अंतर पडेल जागीरदार तो आपले कडून [१६]उपाधीस चुकत नाहींत; हें इकडून मात्र बरदास्त करण्यांत येती; याची सल्ला कैसी करावी हे सांगितलें पाहिजे. कलम १.

जबाब—**आलजपूरचे**[१४] मुक्कामीं नबाबाचा व तुमचा तह जाला आहे त्या प्रमाणें परस्परें वर्तणूक असावी; कांहीं नवाबाकडून व त्यांजकडील जागीरदाराकडून जास्ती जाली असल्यास त्यासीं बोलून बंदोबस्त करून देविला जाईल; येणें प्रमाणें करार करावे.

---

१०. पहिला रघोजी.
११. नर्मदा.
१२. खंडोजी भोंसले.
१३. लोभ व राग.
१३. *a* माजत चालले आहेत, शिरजोर होत आहेत.
१४. एलिचपूर.
१५. बिघाड, भांडण.
१६. उपद्रव करण्यास.



अनुक्रमणिका

सवाल ५—प्रांत **केडवळीत** येथील वतन देशमुखी आमची पूर्वी पासून आहे ती आपण चालवितच आहांत परंतु कसबे मजकूरचे ठाणीं यामुळे व सरकारांत चार गृहस्थ मुत्सदी आहेत याजमुळें कडेकराची हिमायत होऊन ठाणें आमचे स्वाधीन होत नाहीं; त्यास ज्यापक्षीं आमचे तर्फेची आपणास खातरजमा आहे त्यापक्षीं ठाण्याचा रखणा* दरम्यान नसावा, ठाणें देवावेत व वतन संबंधी जाबसाल किरकोळ आहेत ते उरकोन देवावेत व **नगर** हवेली येथील आठरा गांवचा वसूल हुंडीं देतात; त्यास ताकीद होऊन शेकडा दोन रुपये प्रमाणें वसूल प्रगण्याचे वहिवाटी प्रमाणें किजे येविशीं ताकीद जाली पाहिजे. क० १

जबाब—सुदामित चालत आलें आहे त्या प्रमाणें चालेल; त्यांत दिकत पडल्यास ताकीद करून चालविलें जाईल; येणें प्रमाणें करार करावें.

सवाल ६—मौजे **पळसीसंमत वाघोळी** प्रांत **वांई** येथील सिंवेवर डोंगर आहेव तो निमे किल्ले **चांदगिरी** कडील हद्देच्या तिकडे चालत होता व मौजे मजकूरचे तर्फेचा मौजे मजकुराकडेस चालत होता; आलीकडे किल्लेवाले जबरदस्ती करून दरोबस्त राखितात त्यास किल्लेवाले यांस निक्षून ताकीद होऊन पूर्ववत प्रमाणें गांवाचा डोंगर गांवाकडेस चालविला पाहिजे. कलम १.

जबाब—मौजे मजकूरचे हद्देचा डोंगर मौजे मजकुराकडेस चालत होता; हल्लीं तुह्मी चालूं देत नाहीं, साराच किल्याकडेस राखितां; त्यास साल मजकुरा पासून पूर्ववत् प्रमाणें गांवचे हद्देचा गांवाकडे करार करून दिला असे; चालवणें ह्मणून मामलतदारास सनद देवावी.

सवाल ७—**ब्रम्हेश्वरचे** स्थळीं कैलासवासी तीर्थरूप **जानोजी बावा** यांचा व आपला तह जाला तेव्हां पांच लाख रुपये द्यावे ऐसा करार जाला होता त्यापैकीं पेशजी वसूल जाऊन बाकी राहिली असेल ती माफ करावी. कलम १.

---

* रखणा=ठेवणें, 'न्यासस्तु रखणा मतः' रा. व्य. को. श्लो. २२९.

१७. मक्ता.

१८. पुरातन वहिवाट.

१९. श्री ब्रह्मेश्वरानजीक झालेला एक तह मागें दिला आहे. लेख १९ वा पहावा. परंतु त्यांत ५ लाख रुपयांचा निर्देश कोठें आढळत नाहीं. ह्याच स्थळीं दुसरा एकादा तह झाला असावा असें दिसतें. हा दुसरा तह मिळविण्याचा आमचा प्रयत्न चालू आहे.

**जबाब** — दोनलक्ष सत्तरहजार रुपये नजरे पैकीं बाकी येणें ती माफ केली असेत; येणें प्रमाणें करार करावे.

**सवाल ८**—प्रगणे **येरल** प्रगणे **नळदुर्ग** येथें तीर्थरूप कैलासवासी **जानोजी बावा** यांचा कोंळ जाहला तेथें देऊळ बांधणें, अन्नछत्र घालावयाचें आहे, लांकुड फाटे वगैरे तेथील साहित्यास मौजे मजकूर स्वराज्याचा अमल सर देशमुखी बाबती व चवथाई वगैरे सुद्धां दरोबस्त इनाम करून देविला पाहिजे. कलम १.

**जबाब**—आलाहिदा यादीवर मर्कलासी[21] झाली आहे त्याप्रमाणें चालेल; येणें प्रमाणें करार करावे.

**सवाल ९**—दरसाल पांचहजार रुपयाचें कापड **बाळापूरचें***व **वासीमचें** द्यावें हें ब्रह्मेश्वरचे तहांत[22] आहे तें माफ करावे. कलम १.

**जबाब.**— या गोष्टीची रदबदल करूं नये. करारा प्रमाणें पांचहजार रुपयाचें कापड सरकारांत देत जावें; मागील कापड सरकारांत आलें नाहीं. तें सन खमस समानीन पर्यंत माफ केलें असे; पुढें दरसाल देत जावें; येणें प्रमाणें करार करावे.

**सवाल. १०**—मौजे **दहिगांव** व मौजे **पळसीसंमत वाघोली** प्रांत **वांई** हे गांव पूर्वी पासून आह्मांकडे चालत आहे त्यास जिल्हेबाब प्रतिनिधी कडील व मोकास बाब पैकीं व कसर पांचोत्रा आदिकरून उपद्रव आहे तो कुलबाब[23] व कुलकाडी दरोबस्त इनामपत्रें करून देऊन निर्वेध जालें पाहिजे. कलम १.

**जबाब.**—दोहीं गांवाकडे सरकारचा व प्रतिनिधी कडील अमल आहे त्याचा मखता ठहरावून द्यावा.त्याप्रमाणें दरसाल ऐवज घेत जावा.ज्यास्ती फरफर्मावीस वगैरे कोणेविशीं उपद्रव न लावणें; रोखापत्र गांवावर न करणें ह्मणून सरकारचे मामलेदार व प्रतिनिधी यांसी सनदा एविशीं-

---

२०. सन १७७२ च्या मे महिन्यांत तुळजापुराजवळ गोदावरी नदीतीरीं एक खेडें आहे तेथें प्रकृति बिघडून जानोजी मरण पावला असें इतिहासांत [ग्रांट डफ याचे] आढळतें.

२१. मुकररपणा. ठराव.

*. हीं दोन्ही शहरें वऱ्हाड प्रांतांत प्रसिद्ध आहेत.

२२. बाळापर व वासीम या ठिकाणांच्या कापडाविषयीं उल्लेख मागील १९ व्या लेखांत नाहीं तेव्हां श्री ब्रह्मेश्वर येथें दुसरा तह झाला असावा हें अनुमान प्रस्तुत कलमावरून दृढ होतें.

२३. सर्व कर व सारा वगैरे.

च्या मर्केलासीच्या[२४] यादी आलाहिदा जाल्या आहेत त्याप्रमाणें सनदा दिल्या जातील; येणें प्रमाणें करार करावे.

सवाल ११.—तरकड कलमें कैलासवासी **दिवाकर पुरुषोत्तम** यांचे वेळेस ठरले आहेत त्या प्रमाणें वर्तणुकींत[२५] असावे. कलम. १

जबाब.—येणें प्रमाणें करार करावे.

सवाल १२.—पूर्वील करार व तह असा आहे कीं प्रांत **वडोसा** व **कटक** दरोबस्त इकडे जे चालत आहे ते चालऊन त्या शिवाय बाबत सुभे **मकसुदाबाद** व **पट्टण** बारालक्ष रुपये ऐन शिवाय कारकुनी दोन लक्ष रुपये एकून चवदा लक्ष रुपये प्रतिवर्षी देत जावे, हा ऐवज तहाप्रमाणें पूर्वी पोहंचत गेला सांप्रत **इंग्रेजा**कडील या हिसेबाची करोडो रुपये बाकी निघती त्यास **आंग्रेजा**कडील जबाब सालसलुखाचा[२६] आपणा कडील ठरला. आमचा तैसाच राहिला आहे त्यास आपले सलुखांत सर्वत्रांचा सलूख या करितां **आंग्रेजा**कडील आमचे तहाचा ऐवज ताकीद होऊन त्याचा मार्ग घडावा, त्याणें मार्ग न केल्यास आम्हांकडील फौज जाऊन ज्या प्रमाणें ऐवज मिळेल त्या प्रमाणें घेण्यांत येईल, त्या प्रांताचा व त्या सुभ्याचा जिमा पूर्वी पासून आमचा आहे. जें साहस व जो प्रकार घडला आहे तो विदितच आहे तेव्हां दुसऱ्यांनीं उद्योग करावा ऐसे तों नाहींच, याजकरितां येथून पुर्त्या निश्चयाविशीं करारांत यावें. कलम १.

जबाब—प्रांत **उडीसा** व **कटक** दरोबस्त तुह्मांकडे चालत आहे. सुभे **मकसुदाबाद** व **पट्टण** येथील करार ऐवजाचा तुमचा आहे त्यास एविशीं **इंग्रेजा**सीं बोलून स्नेहाचे वाटेनें जैसें होईल तैसें केलें जाईल. करार करावे.

सवाल. १३— प्रांत **गढेमंडले** येथील **नर्मदा** दक्षणतीरचा दरोबस्त तालुका बमेय **चौरागड** हा पूर्वी कैलासवासी **नानो साहेब** यांणीं तीर्थरुप कैलासवासी **बाबा साहेब** यांसी दिल्हा होता, त्या प्रमाणें तिगस्तां राजश्री **बळवंतराव विष्णु** यांचे विद्यमानें दरोबस्त

---

२४. कायम ठरावाच्या.

२५. वहिवाटींत, अमलांत.

२६. एकोप्याचा, स्नेहाचा.

२७. हा मोडकळीस आलेला किल्ला नरसिंगपुरापासून १० कोसांवर आहे. पूर्वी येथें गोंडराजांचे वाडे होते त्यानंतर भोंसले सरकारानें आपल्या सैन्यासाठीं नवीन इमारती बांधिल्या.

२८. बाळाजी बाजीराव.

तालुके यांच्या सनदा करून दिल्या. त्या प्रमाणें हल्लीं सनदा चिरंजीव **सेना साहेब** सुभा यांचे नांवें करून द्याव्यात. कलम १.

जबाब—पेशजी करार जाला आहे. त्या प्रमाणें सनदा देविल्या जातील येणें प्रमाणें करार करावे.

सवाल १४—प्रगणे **सिवनी हुशंगाबाद** बमये किल्ला व **मुनोर चालसा** व **बाडी** वगैरे हे माहाल कदीम पासून स्वस्थान **देवगडचे** तालुक्यांतील तेथील अमल **भूपाळकरांनीं** दाबिला आहे; करारबाकी मिळत नाहीं. याविशीं ताकीद पत्रें संस्थानिकांस देऊन व सनदा पुर्वेवत प्रमाणें चिरंजीव **सेनासाहेब सुभा** यांचे नांवें करून देवाव्या ह्मणजे तेथील बंदोबस्त करण्यांत येईल. कलम १.

जबाब—पूर्वी पासून चालत आहे त्याप्रमाणें चालवावें व माहाल दाबिले असतील ते सोडून द्यावे. एविशीं **भूपाळकरांस** पत्रें देवावीं. येणें प्रमाणें करार करावे.

सवाल १५—जेथें दवलता तेथें दायादसंबंधी द्वेष व संचार नानाप्रकारचे; त्याणें कोणेंही प्रकारें स्थीर चित्त राहूं नये, ऐसे त्याजकडील चाल. संधी पाहून फंद करावे. कौंबु[29] वेळप्रसंग त्याणीं पाहात असावा, त्यास कोणेही द्वेष बुद्धीनें अथवा वैर संबंधी या दवलतीचे अपायाविशीं चलना करील व अनुसंधान लावील तें लागू देऊं नये एविशीं त्यास निषेध व शिक्षा आपणाकडून पूरती असावी, आणि इकडील खातरजमा पूर्ती करावी, व मातबर[30] सरदार इकडिल आपलेकडे आला तरी त्यास आमचे इतल्या शिवाय व मर्जी शिवाय आपणापाशीं ठेऊं नये कथंचित त्याज कडून अनुसंधान आले, तरी त्याचा इतल्ला[31] आह्मास करावा, दायाद अथवा सरदार यांसि जागा मिळूं नये, आमचे स्वाधीन करून द्यावे; त्याचें येथून चालविण्यांत येईल. कलम १.

जबाब—तुह्मीं स्वरूपा प्रमाणें चालवावें; ऐसें करितां कोणी सरकारांत आला तरी त्यास आसरा देणार नाहीं, व सरकारचे सरदार वगैरे तुह्मांकडेस कोणी गेला तरी तुह्मीं ठेऊं नये, आसरा देऊं नये, येणें प्रमाणें करार करावे.

सवाल १६—**देऊर** संमत **वाघोली** प्रांत **वाई** हा गांव दरोबस्त इनाम राजपत्रीं आह्मांकडे आहे तेथील सरदेशमुखी व कसर पत्रोत्रा एकून

२९. अनुकूल. चांगला. कामगिरी साधण्या जोगा.

३०. बलाढ्य, जोरावर, श्रीमंत.

३१. सूचना. बातमी.

तीनशें रुपये सरकारांत घेतात त्यास मौजे मजकूर येथील सरदेशमुखी व कसर पचोत्रा सुद्धां अंमल कुलबाब कुलकाणु[32] दरोबस्त इनामपत्र करून देऊन निर्वेध जालें पाहिजे. कलम १.

जबाब—त्याची मकलसी आलाहिदा जाहाली आहे. त्याप्रमाणें चालेल येणें प्रमाणें करार करावे.

सवाल १७—मातबर मसलतीस इकडून सामील व्हावें. व तिकडून बोलावणां हेच सल्ला, यांतील तीन प्रकार, प्रथमतः स्वतां मातबर फौजे सुद्धां यावें अथवा चिरंजीवास बिदा करावें अगर कोणी मातबर सरदारा बराबर फौज देऊन बिदा करावे या तिहीं प्रकारांतून भलता एक प्रकार यथा शक्ति जैसा प्रसंग पडल्या प्रमाणें घडेल. परंतु **फत्ते आलिखान** अथवा दुसरी मोहीम येऊन नमुद झाली त्या प्रसंगास आपले स्वरूपानुरूप यावे व घडावें ऐसीं पत्रें जेव्हां येतील तेव्हां त्या प्रसंगास येऊन घडविलें पाहिजे. याचें घडणें व आह्मां कडून घडविणें हें सर्वस्वी आपणाकडेस आहे. श्रीमंत **महाराज** कैलासवासींचे वेळेस तीर्थस्वरूप **बावासाहेब** यांचें जाणें **करनाटकास** झालें होतें तेवेळेस वाटणी नेमून दिल्ही होती हें आपले ध्यानांतच आहे, **करनाटकाचा नागपुराहून** पल्ला लांब व त्या मुलकांत वरकडां सारखी सोय इकडील नाहीं, याजकरितां सूचनार्थ लिहिलें असे त्यास फौजेचे पोटाचा बंदोबस्त व्हावा. गैंळाटा[33] झाला न पाहिजे. क. १.

जबाब—खर्चास द्यावयाचा आलाहिदा यादीवर करार झाला आहे त्या प्रमाणें पावेल. येणें प्रमाणें करार करावे.

सवाल १८—मौजे **आसनगांव** व प्रांत **वाई** येथील **कुरंद भीकाडोंगराचे** व **चंदावांदाचे [चंदनवंदन]** पाहिले पासून आह्मांकडे **देऊरी** असतां दाबिले चालत होते अलीकडे किल्ले **चंदनवली** याणीं दाबिले आहेत ते हल्लीं पूर्ववत प्रमाणें आमचे आह्मांकडेस बाहाल करून देऊन एविशीं ताकीद पत्रें **चंदनवली** यांस जाली पाहिजे. कलम १.

जबाब—**आसन** गांवचे **भीकाडोंगराचे** कुरंद[34] व **चांदावांदा** येथील कुरंद चालत होतें. अलीकले चालत नाहीं. ते पुर्ववत प्रमाणें करार करून दिल्हे असेत. यांजकडे चालवणें ह्मणून मामलतदारास सनद देवावी.

---

३२. सर्व प्रकारचा सारा, कर इत्यादि.
३३. अव्यवस्था
३४. कुरण.

शतपुत्रक्षयहोतां साहे निःसीम शोकतापातें ॥
साधु न दे शापातें जाणे तन्मूळ पूर्वपापातें ॥ १६ ॥
एकत्र नग्न सुप्त स्वस्त्री-परपुरुष मंदिरीं पाहे ॥
साधु तयांतें झांकी परहृदयक्लेश न च मनीं साहे ॥ १७ ॥
चोंटांत तुझा गुरु या खळवचनें दुःख मानितां मोठें ॥
साधु ह्मणे बा आहे बहु सत्पुरुषांत काय हें खोटें ॥ १८ ॥
दुष्टें गाळी देतां शिष्य ह्मणे यासि ताडितों स्वामी ॥
साधु ह्मणे घेत नसे देतों बा जाणतों भला या मी ॥ १९ ॥
तो चि सिधा द्याया ये शिष्य न घे गुरु ह्मणे अरे पाहें ॥
वाइट तें मद्वचनें घेउनि घेसी न कां बरें बा हें ॥ २० ॥
छळितां पाठी लागे जें भस्म करावयासि वक्रातें ॥
साधु ह्मणे विप्राचा भंगे जें मज नको चि चक्रा तें ॥ २१ ॥
मातेचे पाय जसे छळ करित्याचे तसे चि जो पाहे ॥
साधु निवे न च कोपे न दुरुक्तक्षोभ मानसीं राहे ॥ २२ ॥
भोजन दे चोरांला आदर आग्रह करी स्वयें मोटा[1] ॥
साधु प्रसन्नचित्तें बांधुनि लागे वहावया मोटा ॥ २३ ॥
रीति न कोणाची ही या अतितर सरळ रीतिशीं तुकली ॥
साधु ह्मणे तस्कर हो घ्या तुमची एक आंगठी चुकली ॥ २४ ॥
आंगावरि नित्य थुके एके दिवसीं न त्या खळा पाहे ॥
तद्द्वारीं साधु उभा तें तद्वृत चालवावया राहे ॥ २५ ॥
फिरफिरुनि मुतें पादे उघडी ठेवूनि मस्तकीं गांड ॥
साधु ह्मणे जन हसवुनि रिझवुनि धन मेळवूं सुखें भांड ॥ २६ ॥
नरकींचे वदले बा सुखनिकट उभा असोन दे वातें ॥
साधु ह्मणे हें च बरें जें स्वर्गींचें असो न देवा तें ॥ २७ ॥
जे जीव पतित नरकीं ते पुण्यें उद्धरूनियां सर्व ॥
साधु स्वर्गा गेला ज्याच्या चित्तीं न लेश ही गर्व ॥ २८ ॥
जों जों प्रायश्चित्त ब्राह्मण आग्रह करूनियां देती ॥
तों तों साधुमनांत प्रीति न चतुराननीं[2] हि नांदे ती ॥ २९ ॥
जो विष पाजी भाजी त्याच्या ही नरकयातना चुकवी ॥
गाती सात्विकभावव्याप्त सदा साधुरीतितें सुकवि ॥ ३० ॥

---

१ मोट=ओझें. २ चतुरानन=ब्रह्मा

अनुक्रमणिका

प्रभुनें छळिला आंगें सर्वस्व हरूनि बांधिला छद्में[3] ॥
परि साधुनें भुलविला प्रभु अलि सौगंधिकें जसा पद्में ॥ ३१ ॥
वाढवि अन्याणुगुणा साधु सदा वायु जेंवि फुणगीतें ॥
सुयशानें जरि साजे लाजे परि फार आत्मगुणगीतें ॥ ३२ ॥
ज्यासह घडतें दैवें सहज पथीं चालणें पदें सात ॥
त्या मित्र साधु ह्मणती देती च व्यसनसागरीं हात ॥ ३३ ॥
समजुनियां गर्भवती झाली भ्याली उदंड रंडा तें ॥
साधु ह्मणे घे माझें नाम मुलि भिवूं नको चि दंडातें ॥ ३४ ॥
गेली निघोनि आली दुकळीं वेऊनि ती पती पोरें ॥
साधु तिला प्रतिपाळी गावी सद्रीति आदरें थोरें ॥ ३५ ॥
कोणी बहु बोधें ही सोडुनि सुक्षेत्र आग्रहें जाय ॥
ज्याच्या शद्वें परते साधु खैराचे हि त्या नमी पाय ॥ ३६ ॥
प्रणत जनाचें जाया सिद्धिप्रति सर्व योजिलें कार्य ॥
साधु मरण पथकरिती ऐसी सद्रीति वर्णिती आर्य ॥ ३७ ॥
दे अन्न अंत्यजां जें केलें तर्पावयासि पितरांतें ॥
हें साधुशील दुर्लभ लोकीं कालत्रयीं हि इतरांतें ॥ ३८ ॥
अंत्यजतोक कडे घे उष्णीं ज्या फार लाळ सेंबुड तें ॥
अद्भुत सुकृत न गातां साधूंची रीति आळसें बुडते ॥ ३९ ॥
ज्यांचीं चरणाब्जरजें ब्रह्मेंद्राद्यमरमस्तकीं लेणीं ॥
तत्प्रियसख साधु वळी आपण पुरवावया मठीं शेणी ॥ ४० ॥
निंदा शाप हि ध्यावा परि हरिस भजा असें चि सांगावें ॥
हें सच्छील त्यागुनि कुशलें तीर्थांदि अन्य कां गावें ॥ ४१ ॥
हस्तीं धन आलें जें तें देवब्राह्मणासि अर्पावें ॥
स्वापत्य तसें प्रेमें अन्नार्थि प्राणिजात तर्पावें ॥ ४२ ॥
कृष्णीं प्रेम जयांचें तद्व्यभिचारास ही न लेखावें ॥
रेखावें साधुजनें हृदयीं त्यांतें गुरू च देखावें ॥ ४३ ॥
सद्रीति हे अभक्ता जरि तरि मातेस ही न मानावें ॥
वानावें वेश्येस हि भुलली जी काय राम या नांवें ॥ ४४ ॥
साधु प्राणी पाहुनि संसारीं तापलें असुख पावे ॥
व्हावे जग मुदित ह्मणे तदुःखें आपले असु खपावे ॥ ४५ ॥

---

३ छद्म=कपट. ४ व्यसन=संकट ५ खर=गाढव. ६ शेणी=गोंव-या.
७ जात=समूह.

विषयविष चि बा हो हरिजन कांपायांस भाळला जीव ॥
विधिविभुचा लावुनि हितजन कां पायांस भाळ लाजीव ॥ ४६ ॥
कवि ह्मणाति न दुग्धगृहा आंतुनि होवूनि खर्व ओतु निघे ॥
साधुसभेंत वस तसा हरियशकर्णांत सर्व ओतुनि घे ॥ ४७ ॥
साधु अभयवर दिधले न कधीं च जसे करी रदं बदलिती ॥
जसि सद्रीति जडांची श्रीप्रभुजवळि न करि रदबदलि ती ॥ ४८ ॥
हे दुर्मतिघ्रुस करी रंध्रें बहु मानसा धुरी तीतें ॥
यास्तव सर्व हि हरिजन देतिल बहुमान साधुरीतीतें ॥ ४९ ॥
हे साधुरीति लिहिली मयूरें रामनंदनें ॥
या ग्रंथें पूर्ण साधूंचा हो जैसा काम नंदनें ॥५० ॥

इतिश्रीरामनंदनमयूरेश्वरविरचिता साधुरीतिः

॥ पद १ ॥

दाशरथे ऐसे चि करीं पदपद्में पावन पापी ॥ ध्रु ॥
वासरा[12]धिपतिकुलतिलका हरिनीलनवाभ्रश्यामा ॥
आसरा जयश्रीकीर्तिप्रति अकुतोभय तूं रामा ॥
अमलातुलसद्गुणधा[13]मा ॥ शमम[14]लापहशोभननामा ॥
नमलानर्मांशीलनिधे मी वापी ॥ १ ॥ दाशरथे० ॥ १ ॥
तोकाला माय मयूरा जैसी नवनीर[15]दमाला ॥
लोकाला कीर्ति तुझी हे तैसी सुखवू नरपाळा ॥
शमवीं भवदावज्वाळा रमवीं स्वयशें सुरबा[16]ळा ॥
भ्रमवी खळ एक जगीं हो चापी ॥ २ ॥ दाशरथे० ॥ २ ॥

॥ पद २ ॥

सख्या रामहरे कृष्णहरे बोल वरें ॥ धृ ॥
दुस्तरा भवार्णवासि सर्व पूर्वजां समेत ॥
या कलींत हीं सुखें चि विघ्न लाजवूनि तरें ॥ १ ॥ सख्या० ॥ १ ॥
भव्यधाम रामनाम काम पूर्ण तू[17]र्ण करी ॥
तारिले अनेक जीव कीं कथूनि हें चि हरें ॥ २ ॥ स० ॥ २ ॥

---

८ ओतु = मांजर. ९ करी = हत्ती. १० रद = दांत. ११ नंदन = पुत्र ; इंद्राचें वन. १२ वासराधिपति = सूर्य. १३ धाम = गृह. १४ शममलापह = पापनाशक. १५ नीरद = मेघ. १६ सुरबाळा = देवांगना. १७ तूर्ण = सत्वर.

नाम-मेघसक्त भक्त मोर यासि हर्ष थोर ॥
होय हृदय अमल अमल शमल नुरे मान खरें ॥ ३ ॥ स० ॥३॥

॥ पद ३ ॥

हृदया वरें विचारीं ॥ नाम स्मरें न तापें ॥ ध्रु० ॥
भगवान अजामिळाला नामें गजा मिळाला ॥
गणनातिगें गिळाला ॥ नाम प्रताप पापें ॥ १ ॥ नाम० ॥
ज्यांचे मनांत थारे गिळिले अरीति सारे ॥
प्रभुच्या असें न बारे ॥ केलें रणांत चापें ॥ २ ॥ नाम० ॥ २
नामीं च भाव राहो ॥ दुष्कर्मपंक वाहो ॥
सौख्या मयूर लाहो ॥ जें मोजवे न मापें ॥ ३ ॥ नाम० ॥

## ॥ वामनादिकीर्तनं ॥

साक्षात् श्रीविष्णु ऐसें चि ॥ मानवा मान वामना ॥
दोषांचा लेप चढवी ॥ मान वामा नवा मना ॥ १ ॥
भुलसी विषया येणें ॥ उलसील महाऽसुखें ॥
कुलशीलमदत्यागीं ॥ तुलसीदास गा मुखें ॥ २ ॥
कीर्तिला तीर्थ पादाचा ॥ जेणें सद्भक्त चांगया ॥
सांग या सत्पदनता ॥ पिंडा झाली न कां गया ॥ ३ ॥
लाजो तुझ्या सुरांचा [ही] ॥ नगे मोहा निवृत्तितें ॥
भय वारिल नमितां ॥ न गमो हानि वृत्तितें ॥ ४ ॥

---

समाप्त.

१८ अराति = शत्रु. १ वामा = स्त्री. २ नग = वृक्ष.

## ॥ श्रीकृष्णामाहात्म्यारंभः ॥

॥ श्लोक ॥

श्रीकृष्णेची परम सुखदा सत्कथा आयकाया ॥
हे बाळाच्या शुचि करि जसी वत्सला माय कौया ॥
वक्त्रीं चित्तीं हितकर इचें सर्वदा नांव राहो ॥
तीर्थी योगा हयमखशता सर्वदां ना वरा हो ॥ १ ॥

भाग्यें विलोकुनि महामुनि नारदातें ॥ पूजूनियां ऋषिभवांबुधिपारदातें॥
जोडूनि हस्त वदले कलिदोषदावा ॥भ्यालों प्रभो सुपथ देउनि तोष दावा॥२॥
जोडूनि पापें नरकीं भरावें ॥ कैसें महोग्रा कलितें तरावें ॥
अन्नोदक त्यागुनियां मरावें ॥ सांग प्रभो काय कसें करावें ॥ ३ ॥

॥ आर्या ॥

देवर्षि ह्मणे ऋषि हो जेणें पुरुषार्थ सर्व जोडावा ॥
ब्राह्मणदेह सुदुर्लभ तो न कलिभयें कदापि सोडावा ॥ ४ ॥
श्रीहरिहरयश असतां तत्संकीर्तन करावया रसना ॥
कां मरण वांछितां हो दुस्तर मानुनि मनीं कलिव्यसना ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥

प्रकट हरिहरांची कीर्ति जी या नदीनें ॥
धुवुनि मळ करावें सत्पदा या न दीनें ॥
कळिस बळ न कांहीं सेतु हा वाळवेचा ॥
त्यजुनि अघभयातें कीर्तनीं काळ वेंचा ॥ ६ ॥

कर्षणें जसि कृषीवळें भुक्ती ॥ कीर्तनें कुशळ साधिति मुक्ती ॥
त्यागिती न बुध मौक्तिकशुक्ति ॥ हे धरा स्वहृदयीं शुचि उक्ति ॥ ७ ॥
कीर्तनें चि पुरुषार्थ साधती ॥ पातकें हरिजना न बाधती ॥
या युगीं गुण असे असा रहा ॥ स्वस्थधी काळि नव्हे असार हा ॥ ८ ॥

॥ आर्या ॥

ऋषि हो विष्णुप्रभुनें आणिक ही निर्मिलें असे त्राण ॥
कथितों तें हि कलिभयें होउनि विकळ त्यजूं नका प्राण ॥ ९ ॥

---

१ काय=शरीर. २ अंबुधिपारद=समुद्रपार करणारा. ३ दाव=अग्नि.
४ व्यसन=संकट. ५ कृषीवळ=शेतकरी. ६ शुक्ति=शिंप.

# सूचना.

( १ ) सन १८७८–७९, ८० सालचे १२ अंकाच्या प्रती ज्यांस पाहिजे असतील त्यांणीं दर सालचे अंकांस ५ रु० ९ आणे प्रमाणें आह्मांकडे किंमत पाठविली असतां त्यांजकडे रवाना होतील. सन १८७८ सालचा पहिला अंक शिवाय करून बाकीचे अंक फुटकळ विकत मिळतील. दर अंकाबद्दल ०८०६ पाठविल असतां अंक रवाना होतील.

(२) वर्गणी खालीं लिहिलेले गृहस्थांकडे पाठविली असतां आह्मांस पोंचेल.

रा. रा. श्रीधर गणेश जिन्सीवाले एम. ए., प्रोफेसर. मुंबई.
,, ,, शिवराम परशराम भिडे. एम. ए. ............बडोदें.
,, ,, कृष्णाजी मोरेश्वर, डिस्ट्रिक्ट जज्ज आफीस....ठाणें.
,, ,, काशिनाथ नारायण साने, बी. ए., हायस्कूल, पुणें.
,, ,, सावळाराम माधव निसबत सायेर. ............इंदूर.
,, ,, वामन दाजी ओक. सिटीस्कूल ............नागपूर.
,, ,, रामचंद्र जनार्दन वैद्य सरदार हायस्कूल....बेळगांव.
,, ,, काशिनाथ गणेश केळकर बी. ए. ........सातारा.
,, ,, गंगाधर पांडुरंग गद्रे अ० मा० रा० हायस्कूल. कोल्हापूर.
,, ,, परशराम भिकाजी भाव्ये वकील. ........रत्नागिरी.
,, ,, त्रिंबक केशव परचुरे. ........................वसई.
,, ,, विष्णु मोरेश्वर महाजनी, एम.ए. ........उमरावती.
,, ,, बळवंत कमळाकर शिरस्तेदार ........अल्लीराजपूर.

( ३ ) हें पुस्तक सर्वांस घेण्यास सुलभ पडावें ह्मणून याची किंमत वर्षास आगाऊ ४ रुपये ट० ह० ०८६ मागाहून ५ रुपये०८. आगाऊची मुदत पुस्तक घेऊं लागल्यापासून दोन महिन्याचे आंत समजावी. पोष्टाची तिकिटें पाठविणें झाल्यास तीं अर्धआणा किंमतीचीं असावीं व रुपयास०८६ प्रमाणें वर्तावळा पाठवावा.

( ४ ) आमच्या मुक्त्यारांखेरीज दुसरे ठिकाणीं पैसा भरल्यास तो आह्मांस पोंचण्याबद्दलची जबाबदारी आह्मांकडे नाहीं.

या पुस्तकासंबंधें हरएक प्रकारचा पत्रव्यवहार ठेवणें तो काव्येतिहास–संग्रहाचे व्यवस्थापक, घर नंबर २५६, सदाशिव पेठ, पुणें या पत्त्यावर ठेवावा.

अनुक्रमणिका

रा० रा० पां० प० बेंद्रे ... ... २
,, ,, ह० वि० लेले ... ... ४
ग्रंथालय सांवतवाडी... ४८६
,, ,, आ० गो० सायरदार. २८३
,, ,, र० व्हो० सबनीस ... ४८६
,, ,, शि० वि० प्रभु... ... ८८६
रा० रा० कृ० मं० समर्थ,... ... १८६
,, ,, से० ने० ला० एरंडोल. १८६
,, ,, ये० आ० आंबडेकर. ४८२
,, ,, श्री० बा० आपटे ... ८
,, ,, ह० ग० करमरकर... ४८६
,, ,, ग० वि० सहस्रबुद्धे ... ४८६

---

## विषयक्रम.

### बखरी.



### मराठी कविता.



### संस्कृतकाव्यें.

[ काव्येतिहास-संग्रह ]

४

कृष्णाजी अनंत सभासद विरचित

# शिव छत्रपतीचें चरित्र



हें

अनेक प्रतींवरून शुद्ध करून अर्थ-निर्णायक व

अवांतर माहितीच्या विपुल टीपांसह



काव्येतिहास-संग्रह-कर्ते

यांणीं

प्रकाशित केलें.



" यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥
परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ "

भगवद्गीता–४

शके १८०३.

अनुक्रमणिका

श्री

महाराष्ट्राच्या इतिहासाचा व भाषेचा आस्थापूर्वक

अभ्यास करूं इच्छिणाऱ्या सज्जनांस

हा ग्रंथ

परम प्रीतिपूर्वक अर्पण करितों.

ग्रंथप्रकाशक.

कानावर जातांच **विष्णु गोपाळ** येऊन हजर होई तावत त्याचे उत्पन्नाची जप्ती करावी. ह्मणून शेरा **धावडशीस** येऊन ला [ गल्यानंतर ] शके १७७० **चैत्र** शुद्ध द्वितीया बुधवार रोजीं दोन प्रहरीं **छत्रपति महाराज** यांस उदराचा उपद्रव होऊन **कैलासवासी** जाहले.

---

अनुक्रमणिका

[ मागील भागांतील पाठांत क्वचित् फेर आहे तो खालीं नमूद करितों:— ]

| पृ० | ओ०. | सातारा प्रत. | कोल्हापूर प्रत. |
|---|---|---|---|
| १ | ३ | आदिपवित्र. | आदिपत्र. |
| १ | ८ | योगनिष्ठ | योगभ्रष्ट. |
| १ | १२ | राजुरी. | राजुरें. |
| २ | ५ | ब्रह्मवृत्ति. | ब्रह्मचर्य वृत्ति. |
| ३ | २८ व पुढें | आबाजी बल्लाळ. | आवजी बल्लाळ. |
| ५ | ८ | 'आज्ञा घेऊन.' | या शब्दापुढें "सामील चिमणा दामोदर वगैरे फौज घेऊन." असे शब्द. |
| ८ | २१-२२ | बापुजीपंत तांबे. | बापूजी राम तांबे. |
| ९ | १६ | दुसरा नारळ. | दुसरे न[illegible]ळ. |
| ९ | ३१-३२ | 'स्वामी विनाश्रय" इ०. | "स्वामीविना त्रैलोक्यांत आधार नाहीं." |
| १० | १३-१४ | 'धोंडो भास्कर' इ०. 'कल्याण प्रांतें होता.' | "धोंडो भास्कर तांबे गोदाजी क[ला]ठे हशमी सरदार होता." |
| १० | २३ | तालुके. | तर्फ. |
| ११ | ११ | मौजे मजकुरीं बाग. | मौजे मजकुरी शेरी व बाग. |
| ११ | ११ | कागदपत्र न्यावे. | कागदपत्र जपावे. |
| १२ | १ | ऐन गल्ला. | अर्धल गल्ला. |
| १२ | ९ | ते दिवशीं निर्वैर. | ते बिनीवर नदर देऊन. |
| १३ | १४ | तीन गांव × × × | तीन गांव उपनाम |
| १३ | १९ | प्रांत तर्फ कढेपटार. | तर्फ कऱ्हेपठार प्रांत पुणें. |
| १३ | २१ | टिळक. | टिंबे. |
| १४ | २६ | क[ला]चें. | कजियाचें. |
| १५ | २ | वस्तवाल इ०. | अस्तमानीं सर्व. |
| १५ | ९ | परस्पराचा. | परस्पर. |
| १६ | २५ | तुझा बळजा. | मुलाहिजा. |
| १६ | २५ | तंगकरी देऊन. | तगरीहून. |

समाप्त.

अनुक्रमणिका

चौघे मराठे मातबर दरम्यान येऊन राजश्री **रामाजी बल्लाळ** निसबत **पंत प्रधान** यांचे विद्यमाने तह ठरला. कलमें बितपशील.

१. चिरंजीव राजश्री **बापू** यास मातुश्री **बाई**च्या ओटींत घालावे.

२. तुमच्या संतोषास आलें तरी आमचे संमतें कारभार तुम्हीं करावा.

३. दोहींकडील फौज भारी, इतके लोक ठेवावयाचें कारण सध्या नाहीं. यास्तव जितकी फौज कार्याकारण ठेवावयाची, तेवढी ठेवावी. जे दूर करणें त्यांचा फडशा हिशेबाचा आम्हीं करावा. याशीं तुम्हीं अनुकूळ असावें. सदर्हू तीन कलमांचे निभावणीस दरम्यान असाम्या बितपशील.

१ लक्ष्मणराव पाटणकर, २ जोत्याजी व चिमणाजी घाडगे, ३ बाजीराव पाटणकर, ४ यशवंतराव नाईकजी निंबाळकर, ५ राणोजी नाईक निंबाळकर, ६ जगदेवराव नाईक निंबाळकर, ७ जगोजी यादव, ८ नऱ्होजी जाचक, ९ मजीतखान रोहिले, १० हणवंतराव बाजी घाडगे.

एकूण असामी दहा यांचीं पत्रें अलाहिदा आहेत. त्याप्रमाणेंच उभपक्षीं निभावणी होईल.

सु॥ सलास सबैनमया व अलफ माघमास चं० २४ जिलकाद हे विज्ञापना.

[ ३२ ] ॥ श्री ॥

श्रियासह चिरंजीव राजश्री **साबाजी भोसले सेना साहेब सुभा** यांसि प्रति **मुधोजी भोसले सेना धुरंधर** कृतानेक आशीर्वाद उपरि तुमचा व आमचा हर्षामर्ष वाढला याजमुळें फौज ठेवून कलहास प्रारंभ झाला, याकरितां चौघे मराठे मातबर दरम्यान ठेवून राजश्री **रामाजी बल्लाळ** निसबत **पंत प्रधान** यांचे विद्यमानें तह ठरला बितपशील.

१. चिरंजीव राजश्री **बापू** यांस मातोश्री **बाई** यांचे ओटींत घालावें.

२. आमच्या संतोषास आलें तर तुमचे संमतें कारभार आम्हीं करावा.

३. दोहींकडील फौज भारी, इतके लोक ठेवावयाचें कारण सध्यां नाहीं. यास्तव जितकी फौज कार्याकारण ठेवावयाची ती ठेवावी. जे दूर करणें त्यांचा फडशा हिशेबाचा तुम्हीं करावा. त्यास आम्हीं अनुकूळ असावें.

सदर्हू तीन कलमाच्या निभावणीस दरम्यान असाम्या बितपशील.

**१ लक्ष्मणराव पाटणकर, २ जोत्याजी घाडगे व जिमाजी घाडगे, ३ बाजीराव पाटणकर, ४ यशवंतराव नाईक निंबाळकर, ५ नऱ्होजी जाचक, ६ राणोजी नाईक निंबाळकर, नाईकजी व ७ हणमंतराव घाडगे, ८ जगोजी यादव, ९ जगदेवराव निंबाळकर, १० मजीतखान रोहिले.**

एकूण असामी दहा यांचीं पत्रें अलाहिदा आहेत. त्याप्रमाणेंच उभयपक्षीं

निभावणी होईल. रोज चंद्र ४ माहे जिल्काद सु ॥ सलाद सबैनमया अलफ हा आशीर्वाद.

[ ३३ ] राजश्री **जानोजी भोसले सेना साहेब सुभा** गोसांवी यांस सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आळंकृत राजमान्य स्ने ॥ **माधवराव बल्लाळ प्रधान** आशीर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहावें विशेष; आपण पत्र पाठविलें तें पावलें लिहिलेलें वर्तमान कळलें, व राजश्री **सदोबा**स पत्र पाठविलें त्यांतील आशय मशारनिल्हेनीं सांगितले, त्यास विस्तारें करून राजश्री **दिवाकर पुरुषोत्तम** यास लिहिला आहे त्याजवरून कळेल. आपण सत्वर त्यांस पाठवून द्यावें. वारंवार संदेह न धरितां पाठवून द्यावें. वरकड येण्या वगैरेचे प्रकार **सदोबा**शीं बोलण्यास आले आहे. हें लिहितील त्यावरून कळेल. आपण निघून सत्वर यावें. चंद्र ९ माहे जमादिलाखर बहुत काय लिहिलें लोभ असूं दिजे हें विनंती.

[ ३४ ] राजश्री **जानोजी भोसले सेना साहेब सुभा** गोसावी यास सकळ गुणाळंकरण अखंडित लक्ष्मी अळंकृत राजमान्य राजश्री स्ने ॥ **माधवराव बल्लाळ प्रधान** आशीर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशळ लिहावें. विशेष, राज्जश्री **चिमणाजी रखमांगद** आले आणि सर्वार्थ निवेदन केला, त्यास मागें जे संशय आले ते येथें सांगितल्यावरून कळले, याविषयीं येथें शपथ पुरस्कर संदेह राहिला नाहीं, तरी आपली खातरजमा असावी, परंतु राजश्री **दिवाकर पुरुषोत्तम** यास बोलण्यास पाठवावें. येथें आल्यावर त्यांनीं आपल्या तर्फेचा खातरजमा जशा मागें गोष्टी बोलण्यांत आल्या आहेत त्याप्रमाणें मशारनिल्हेनीं येथील खातरजमा करावी. तसेंच येथून ही याद करार करून दिले आहेत त्याप्रमाणें अमलांत येईल, खातरजमा असावी. ज्यांत **दिवाकरपंता**ची खातरजमा होईल तेच करण्यांत येईल; सत्वरच त्यांस पाठवावें. रवाना चंद्र ९ माहे जमादिलावल बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

[ ३५ ] १ दहा लक्षाचा रोखा तुम्हा सरकारांत लिहून दिला आहे तो तुम्हांस देऊं येणेंप्रमाणें करार करावे. करार.

२ राजश्री **मुधोजी भोसले सेनाधुरंधर** यांजकडील पंधरा लक्षाचा मुलख तुम्हांस देऊं; ह्याचे कर्जदार आहेत ते तुम्हीं वारावे. आम्हीं **मुधोजी** बाबास समजाऊं. येणेंप्रमाणें करार करावे. करार.

३ मोंगल दरोबस्त बुडाल्यानंतर प्रांत **वऱ्हाड** येथील मोंगलाई अंमल तुम्हांस दिला जाईल. करार करावे.

---

* जानोजी भोसले व पेशवे यांच्यामध्यें पुढील करार झाले.

४ **दिल्लींत** वकील सरकारचा आहे तेथें तुम्हीं आपला वकील ठेवावा त्यांनीं सरकारचे वकिलाचे विद्यमानें जाबसाल करावा. येणेंप्रमाणें करार करावे.

५ **भागानगर**[1] प्रांतीं जमिदारी मुलकाचा घासदाणा घ्यावयाचा प्रकार तुम्हीं लिहिला, त्यास तिकडेस जमिदारी मुलूख नाही. तथापि जमिदाराची नावनिशीची याद आणून समजवावी. तुम्हीही हुजूर आल्यानंतर करणें तें केलें जाईल. करार करावे. करार.

६ **लक्ष्मणराव पाटणकर** याजकडे मौजे **पोतलें** व **बैलबडें** दोन गांव इनाम पुरातन राजपत्री आहेत ते चालवावे, त्यास पेशजीपासून चालत आल्याचा भोगवटा राजपत्र मनास आणून चालविलें जाईल. येणेंप्रमाणें करार करावे. करार.

७ **गंगथडी** प्रांतीं तुमचा घासदाणा होता तो मुलूख सरकारांत आला. त्याच्या ऐवजीं **वऱ्हाड**चे सर देशमुखीचा ऐवज देऊं. येणेंप्रमाणें करार करावे.

८ **पटणें** राजश्री **मुधोजी भोसले सेनाधुरंधर** याजकडे आहे तें तुम्हास देऊं. येणेंप्रमाणें करार.

९ कागद सरकारांत घेतला आहे तो तुम्हांस देऊं. करार करावे.

१० भावाबंदाचा पक्ष करूं नये म्हणून त्यास तुम्ही निखालासपणें वर्तल्यास कोणाचाही पक्ष होणार नाहीं. येणेंप्रमाणें करार करावे.

११ सरदार कोणी आम्हांकडील आला तरी ठेऊं नये म्हणून तुम्हीं लिहिलें त्यास तुम्हांकडील सरदार इकडेस आला तरी ठेवूं नये. इकडील तिकडेस गेला तरी तुम्हीं ठेवूं नये. करार करावे.

१२ पहिल्यापासून आपला व आमचा स्नेह त्यास राजा तक्तीं बसल्यावर त्यास कोणी किती प्रकार समजावितील त्यास सर्व प्रकारें सांभाळणी आपली असावी म्हणून लिहिलें त्यास राजा तक्तीं बसल्यावर तुम्हीं आमचे विद्यमानें वर्तल्यास मान अभिमान सर्व आम्हांसच आहे. येणेंप्रमाणें करार करावे. करार.

[ ३६ ][1] श्री

श्रीमंत कैलासवासी **रघोजी भोसले सेनासाहेब सुभा** यांचें देहावसान **सन १२२५** साचे सालीं **फा॥** वद्य **नवमी रोज शुक्रवारीं**[2]

---

१ हैदराबादेस भागानगर असें नांव पडण्याचें कारण ह्या शहराच्या संस्थापकाची भागामती ह्या नांवाची एक आवडती राख होती तिजवरून त्या शहरास हें नांव प्राप्त झालें ( बिगसूकृत निजामाचा इतिहास, भाग २ पृ २४२ पहा )

१ ह्या लेखांत दुसऱ्या रघोजीच्या मरणापासून तों तिसऱ्या रघोजीच्या सिंहासनाधिरोहणापर्यंत झालेली कच्ची हकीकत आहे.

२. इ० स० १८१६ मार्च २२ मरण समयीं रघोजीचें वय ५४ वर्षें १० महिने २० दिवसांचें होतें.

अनुक्रमणिका

जाल्या दिवसापूर्वी आश्विन मासींपासून शरीर प्रकृति दिवसेंदिवस **नानासाहेबा**ची नादुरुस्त. **मुधोजी[३] भोसले** बिन **व्यंकोजी भोसले** सेना धुरंधर यांचे जागीं सेना साहेबाचा लोभ विशेष व **सेनां[४] धुरंधरांचा** काळ श्री क्षेत्रांत झाला सबब **मुधोजी भोसले** व **मैनांबाई** साहेब यांचा तेथून आणण्याचा उद्योग करून त्याजला **नागपुरास** आणून, याजकडील **चंद्रपूर** संस्थानास जाऊन आपण जातीनें किल्ल्याबाहेर नदीवर राहून त्याची वशीर्हत् व जागा त्याचे जिमेस करून याजवरून, त्याजपासी कारपैंरदाज सेनाधुरंधराचे हाताखालीं लोभांतलि वागलेले, नेमून देऊन **मुधोजी भोसले आपासाहेब** याजला समागमें घेऊन **नागपुरास** येऊन **आपासाहेबांस** आपले जवळ घेऊन बसावें व त्यानींहीं लेकुरपणानीं घोडे व हत्ती वगैरे चांगली वस्तु जी न देण्याजोगी असल्यास ती मागावी. त्यास पासेखातर जाणून देत जावी; वस्त्रें दागिना वगैरे उमदी वस्तु घेतली असतां भलत्याच क्षुल्लक माणसास द्यावी. असाही क्रम दिसूं लागला तशांत **रामचंद्र[१०] वाघ** व **मनभट[११]** वगैरेनीं दुर्व्यसना ख्याल[१२] व नाटकशाळा[१३] आदि करून, **आपासाहेबाकडून** करवून, हा प्रकार नमूद वर्तणूक अमर्यादा होऊ लागली, व हें सेनासाहेबास न पहावे. मनांत कळकळा लोभाचा हीं समजूत वडीलपणें सांगणें शिकविणें जातीनींही झालें; व मध्यस्थद्वाराहीं [१४] बोलविलें;

---

३ मुधोजी हा दुसऱ्या रघोजीचा पुतण्या. यास आपा साहेब म्हणत.

४ व्यंकाजी भोसले सेना धुरंधर हा श्री काशी क्षेत्रीं फसली १२२१ सालीं श्रावणमासीं निवर्तला.

५ मैनाबाई–ही व्यंकाजी भोसल्याची बायको. ही श्री काशीहून परत आल्यावर निवर्तली.

६ सांत्वन—रा० व्य० को० श्लो० १८९. वशीयत् ?=बुद्धिवाद.

७. कारभारी.

८. व्यंकाजीचे.

९. पास खातर=विश्वास पूर्वक, भरंवसा जाणून.

१०. रामचंन्द्र वाघ हा–आपासाहेबाच्या खासगी स्वारांचा नायक होता. हा मराठा सरदार मोठा कावेबाज, आंतल्या गांठीचा, पाताळयंत्री, मसलती व साहसी पुरुष होता. आपासाहेबाच्या सांगण्यावरून यानं स्वतः राजवाडयांत ऐन मध्यरात्रीं घेऊन परसोजीच्या वधाची तयारी केली. याचें पुढें आपासाहेबांच्या कारकीर्दीत बरेंच महत्व वाढलें. आपासाहेब ज्या पांच कारभाऱ्याच्या अनुरोधानें वागे त्यांची नांवें– नागोपंत, नारायण पंडित, मनभट उपाध्ये, सिद्दक अल्लीखान व रामचन्द्र वाघ. या रामचन्द्र वावाविषयीं प्रस्तुत लेखांत व 'आपासाहेबांचे पोंवाडयां' त बरीच हकीकत आहे.

११. मनभट उपाध्ये---या ब्राह्मणाकडे परसोजीस मारण्याचें काम आपासाहेबानें सोंपविलें हातें. यास आपासाहेबाच्या कारकीर्दीत लष्करी अंमलाची मोठी जागा मिळाली. याचे वंशज अद्याप नागपुरास आहेत.

१२. चाळे, चार, ढंग, फंद.

१३. जनानखाना, अन्तःपुर अथवा वेश्या.

१४ कळविलें; मार्गावर आणण्यासाठीं चार शब्द सांगितले.

राज्याचे व आपले प्राण ऐसें म्हणत आले. वंशपरंपरेनें चिटणिशी देऊन पत्र शपथपूर्वक त्यांस दिलें, तें माहित असोन, त्यांणीं अपराधही कांहीं केला नाहीं, लहानाचे सांगण्यावर हे गोष्टी कशी केली? सर्व कारकून गेले, मारिले, बेदिल झाले, अन्यायीही झाले, एक एक होते तेही ऐसे केले. पुढें राज्य कसें चालेल?" इत्यादि बोलले. तेव्हां, "आमचेही मनांत ही गोष्ट नव्हती, परंतु रागाचे समयीं बोलले तितक्यावर परवानगी सांगून जालें तें वाईट वाटून उठून आलों. वाईट गोष्ट झाली खरी. तुम्हीं त्यांचे धाकटे पुत्र दोघे आहेत ते खासगीकडे त्याचा बंदोबस्त दरमहा देऊन चालवावे, त्यांचे कारकून लिहिणार त्यांचे हातेंच काम चालवेण्याचें. मुलें लहान आहेत. त्यांजवर कृपा करावयाची" असें सांगितलें. त्याजवरून येसूबाई साहेब यांणीं मुलें दोन खंडो बल्लाळ व निळो बल्लाळ यांचें रक्षण केलें. शिक्के शिवाजी महाराज जिजाबाई साहेब यांजकडे ठेऊन करवीत होते, त्याप्रमाणें संभाजी महाराज यांणीं शिक्के पेटींत घालून, देवापाशीं ठेऊन पेटीची किल्ली[४७] वाड्यांत असावी; शिक्के करणें ते परवानगीची याद जाली म्हणजे नेऊन समजवावी, नंतर शिक्के तेथेंच अणोन करावे, असें येसूबाई साहेब याजपासून करवूं लागले. असें चालत होतें. याजवर त्या कागदावर शिक्के करविणें व आपले कागदपत्र लिहविणें चिठ्ठी[४८]पाटी लिहविणें ते येसूबाई साहेब खंडो बल्लाळ याजपासून करवूं लागली.

महाराज पन्हाळ्यास जाऊन मागती रायगडावर आले. ते पाचौंडे[४९] माचीस राहिले. नवरात्राचा होम कबजीनें करविला. तसा व वार्षिकाचा करून कांहीं दिवशीं हरबाजी फरजंद, व वासुदेव बाळाजी, सुरराव काकडे यांस कोणी समजाविल्यावरून मारिले. कबजी बावांनीं चिटणीशी व कारखाननिशी दादजी देशपांडे यांस सांगावी, म्हणोन विनंती केली. तेव्हां महाराजांनीं "कैलासवासी महाराजांनीं वतनी वंशपरंपरेनें देऊन शपथ वचन दिलें [ त्या अर्थी ] ती गोष्ट घडावयाची नाहीं" असें सांगितलें. त्या दिवसांत अकबर शाहाजादे त्रिंबकास येऊन पावले. यांची बातमी आलियावरि त्यांस राहण्यास जागा धोंडसें म्हणोन गांव रायगडाजवळ आहे तेथें करविली. आणि पादशाहाजादे जवळ आलियावरि पुढें जाऊन भेट घेतली. आणि घेऊन येऊन नेमिले जागां ठेविले. दरमहा लाख रुपये खर्चास नेमून देऊन चालविलें.

त्यानंतर कोंडाजी[५०] फरजंद यांणीं आपण जंजिरे येथें जाऊन फितूर करितों

---

४७. ही शिवाजिची पद्धति ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.

४८. 'चिठीचे पोटीं' पाठांतर.

४९. 'पाचाड' कीं 'पाचाऊ'?

५०. 'खंडूजी' ग्रां० ड०.

[ असें ] म्हटल्यावरून रवाना केला. त्याणें तिकडे जाऊन चाकरी धरिली. आंत जाऊन दारूखाना वगैरे आग लाऊन जाळवावें, भेद होईल तो करावा, असें सांगून ठेविलें होतें. त्यांणीं बटकी खरेदी करून लोकांच्या बायका करून देऊन आपणही एक ठेऊन कबिले सुद्धां म्हणोन चाकरीस राहिले. कांहीं दिवशीं काजी महमद तालकर याची बांदी महाराजांचे सरकारांत[५१] गेली होती ती तेथें त्यांणीं ओळखली. आणि हबशी यांस सर्व वर्तमान सांगितलें. ते समयीं चौकशी करितां सर्व कळलें. नंतर फरजंद याची डोचकी मारिली. कोणास बुडविलें. कोणी पळाले. असें जाहालें. हें वर्तमान महाराजांस कळलियावरि जंजिरा कसेंही करून घ्यावा हें मनांत आणिलें, ते समयीं कबजांचे मारफतीनें दादजी रघुनाथ देशपांड्ये प्रभु महाडकर यांणीं जंजिरा घेऊन देतों म्हणोन बोलणें लाविलें. तेव्हां जंजिरा घेणेंविशीं मसलत करावी हा मनांतील खंबीर[५२], त्यांत कबजीचें राजकारण, जंजिरा घेऊन दिला म्हणजे मजमु अमात्यपद द्यावें असा करार यादीवर करून देऊन आरमाराचे सुभे दौलतखान व मायनाक व काजी महमद व गोविंदजी कान्हो सरंजाम सुद्धां मदतीस देऊन व लोक बराबर देऊन दादजी देशपांड्ये रवाना केले.

आपण धोंडसें गांव येथें पादशहा [जादे] राहिले म्हणून त्याचें नांव पादशहापूर असें ठेविलें. तेथें गेले. अकबर पादशहाची भेट घेऊन आलियावरि भागानगरची पादशाही औरंगजेब यांणीं घेतली [ हें ] वर्तमान आलें. शके १६०५ त घेऊन तेथील बंदोबस्त करून तेथेंच पादशहा छावणीस राहिले. आणि शिवाजी राजे वारले. संभाजी राजे यांणीं लोक बहुत मारिले. बंदोबस्त बेखबरदारी-ही राहतात. या उपर विजापूरची बादशहात आधीं घेऊन नंतर त्याजवर स्वारी करावी ऐसा विचार करून त्याचे प्रांतांतही फौजा पाठविल्या. हीं वर्तमानें येत गेलीं. शाहाजादे याचे बोलणें कीं, "तुम्हीं सारी फौज गोळा करून व आपण मिळोन थोरली[५३] मसलत करून पादशहा याजवरि जावें." हें महाराज यांजकडून घडलें नाहीं. यावरून महाराजांचे चरित्र एक प्रकारचें. यांचे वस्तु[५४] आपले सरबरा[५५] होऊन साध्य घडावयाचे नाहीं. आपण तिकडून येऊन पादशाहाचेही द्वेषी जाहालों. पुढें परिणाम नाहीं. यास्तव बोलणें लाविलें कीं, "आम्हांस सुरतेस जावयाचें. तेथून मक्केस जाऊं. याजकरितां सुरतेपर्यंत

५१. सरकारांत=अमलांत? मुलखांत?

५२. खंबीर=निश्चितपणा-निश्चय.

५३. थोरली मसलत=दिल्लीचो बादशाही मिळण्याचा मनसुबा. अकबरास मराठे व रजपूत साहाय्य होऊन त्यास दिल्लीचे तक्तावर बसविणार अशी गप्प त्यावेळीं जिकडे तिकडे उडाली होती.

५४. यांचे वस्तु=यांच्यामार्फत, हातून.

५५. सरबरा=तयारी, मदत.

पोंचवावें." त्याजवरून निरोप देऊन बरोबर रूपाजी भोसले व मानसिंग मोरे देऊन पोंचविले. ते मक्केस[५६] निघून गेले.

इकडे दादजी देशपांड्ये जंजिरे याजवर जाऊन, प्रांतांत बहुत धामधूम केली. आरमारही भोंवतें ठेऊन जिकडून तिकडून बंदी केली. ऐसे बहुत जेरदस्तींत आणिले. हल्लाही एक दोन वेळां शिड्या लाऊन केला, परंतु त्यांणीं कापून काढिल्या. लोक बहुत मारिले. साध्य न होय. याजमुळें लोक बेदील होऊन उठून चालले. मसलत सिद्धीस जात नाहीं, ऐसें पाहून नामोहरम होऊन उठोन माघारे आले. आरमारही उठोन गेलें. हबशी यांणीं स्वारी करून देशपांड्ये यांचा कबिला महाडाहून धरून नेला. व चौलावर स्वारी करून तेथूनही लोक बहुत धरून नेले. त्याजवरि सिद्दी[५७] मिसरी व दौलतखान व मायनाक भंडारी, संताजी पवळा, गोविंदजी जाधव, व गोविंद कान्हो हे आरमाराचे सरदार नागोठणें व आपटें याकडे आरमार घेऊन गेले. ते उरणचे खाडीनजीक हबशी याचे आरमार जात होतें [ तेथें ] त्यांची यांची गांठ पडली. युद्ध बहुत जाहलें. महाराजांकडील पंधरा गलबतें व सिद्दी मिसरी पाडाव करून नेले. कितेक गलबतें बुडविलीं. कितेक पळून गेले, त्याजवर हबशी बळावत चालला. खैरतखान हबशी याणें मुलकांमध्यें स्वाऱ्या घालून थोर थोर माणसांचे[५८] कबिले धरून नेऊं लागले. लोकांस नांवाजून बक्षीस देऊन मुलकांत फार उपद्रव देऊं लागले. कितेक इकडील लोक राजाची क्रूरता पाहून हबशी याजकडे जाऊन चाकरीस राहते जाहले.

रणमस्तखान[५९] कल्याणप्रांतीं येऊन उपद्रव केला. हें वर्तमान महाराजास कळल्यावरि रायगडाहून निघोन फौजेसुद्धां कल्याणास गेले. रणमस्तखान यांशीं युद्ध देऊन रसद[६०] बंदी [ करून ] व कही मारून जेर केले असतां याकुदखान जंजिऱ्याहून कुमकेस गेले. त्याणीं जाहाजांतून उतरून मधी मोरचे देऊन रणमस्तखान यास रसद पोंचवणें वगैरे पुरावा केला. तो घाटावर रोहिलाखान होते त्यांस कळालियावरि तेही कुमकेस येऊन रणमस्तखान यास निभाऊन घेऊन घाट चढून गेले. महाराज माघारे रायगडास आले.

---

५६. 'इराणास गेले' असें ग्रां० डं० ह्मणतात.

५७. सिद्दी मिसरी हा जंजिऱ्याहून फितूर होऊन संभाजीस मिळाला होता.

५८. कबिले=स्त्रिया. खुद्द महाडकर देशपांडे याचीही स्त्री धरून नेली होती असें वर आलें आहेच.

५९. रणमस्तखान—हा मोंगली सरदार होता.

६०. रसद=दाणादुण्याचा व पैशाचा पुरवठा. कही मारणें=दाणावैरण आणावयास गेलेल्या टोळीवर हल्ला करून ती लुटणें.

कंजीचे रघुनाथपंतांनीं भेटीस येतों म्हणून लिहून पाठऊन पांच हजार स्वार व दहा हजार पायदळ बरोबर घेऊन दर्शनास आले. समागमें तीस चाळीस लाख होन तिकडील रसदें घेऊन आले. बिरवाडीस नदी-किनारां-मांडव घालून भेटी समारंभें करून जाल्या. महाराजांस मेजवानी पंतांनीं केली. सरकारकून वगैरे यांचे बहुमान केले. व महाराजांनीं पंतांचा बहुमान केला. त्याजवरि जनार्दनपंत, व निळो मोरेश्वर प्रधान, व आबाजी सोनदेव, प्रल्हाद निराजी, व उमाजीपंत, संक्राजीपंत व त्रिंबकजी खासनवीस, व रूपाजी भोसले, व हंबीरराव मोहिते सेनापति व नेतोजी पालकर व शिर्के, महाडीक व आणखी कितेक लोक मजालसींत बसले असतां रघुनाथपंतांनीं महाराजांस विचारलें कीं, " राज्य दिवसेंदिवस वृद्धी व्हावी तें कमीच होत चाललें याचें कारण काय? हबशी वगैरे पुंड पाळेगार बळावत चालले हें काय? लोक बेदील.--कितेक ब्राम्हण वगैरे सरदार लोक हे अन्यायी तरि त्यांस बेड्या घालून किल्यावर ठेवून मारावें, ते शिरच्छेद करून, कर्ते मारिले. असो, पुढें सबळ शत्रु औरंगजेब येऊन भिडला याचा विचार काय केला आहे? महा-राज कैलासवासी होऊन बहुत दिवस जाहले नाहींत तों प्रांत उजाड झाले व पाळेगार बळाविले. महाराज कांहीं घेऊन गेले नाहींत." ऐसा पंतांनीं प्रश्न केला असतां महाराजांस हितावह वाटावें तें न घडलें. वाईटच वाटून "राज्या-चा खर्च वाढला आहे." इतकेंच उत्तर केलें. मजालस जहालियावरि आपलें बोलणें महाराजांस वाईट वाटलें, हें पंतास समजालियावरि व दिवसें दिवस एक प्रकारची रीत व कबजीचें प्राबल्य, त्यास राजे परम वश, व लहान माणसें जवळ बोलाविलीं, महाराजांस त्यांचीं बोलणीं व करणीं हितकर वाटतात, आपण आलों असतां पुढील राज्यभार अथवा मसलत [यांजबद्दल] कांहीं एक विचार नाहीं; विजा-पूरची व भागानगरची कुमक करण्याचें राजकारण पंताबरोबर आलें, त्याचा विचार महाराजांस कांहीं एक न माने; ऐसें पाहून तेथें रहाणें [ येणेंकरून ] आपले स्वरूपाची हानि मात्र होईल, वडिलीं मेळविली योग्यता व आज तागाईत आम्हीं

---

६१. रघुनाथ नारायण हनवते—यांस तं-जावराकडील व कर्नाटकांतील कारभार प-हाण्यास शिवाजीनें ठेविलें होतें. हे अमात्य प्रधान होत.

६२. रसद=मुलुखाचा वसूल. वर ६० टी० पहा.

६३. ' मजालसी सभा जेया ' राजव्यव-हारकोश. पंतांची निस्पृहता, धैर्य व राजभक्ति हीं पुढील मजकुरावरून स्पष्ट होतात.

६४. महाराजांस=संभाजीस.

६५. विजापूर व गोवळकोंडें येथील रा-जांनीं आपला व संभाजीचा एक विचार होऊन तिघांनीं एक जुटानें औरंगजेबास प्रतिबंध करावा अशा मसलतीचीं बोलणी पंतांकडे लाविलीं होतीं, त्यांस उद्देशून वरील लेख असावा.

संपादिली ते सर्व जाईल. कबजीसारखे प्रमुख तेव्हां रहाणें ठीक नाहीं. कालाची गतीच अशी दिसती. म्हणून [ व ] चंदी प्रांताचा बंदोबस्त राहिला पाहिजे, तिकडे औरंगजेब यांची फौज धांवेल, म्हणून निरोप घेऊन, स्वार होऊन गेले. चंदीस पावतांच कांहीं दिवशीं वारले. हें वर्तमान आलियावर संस्थान थोर, रक्षिलें पाहिजे. यास योग्य कोण पाठवावें हा विचार करून हरजी राजे महाडीक व निळो मोरेश्वर प्रधान या उभयतांची रवानगी केली. निळो बल्लाळ चिटणीस बरोबर दिल्हे.

महाराज रायगडाहून किल्ले पन्हाळ प्रांतीं जावयास प्रतापगडचे देवीचें दर्शन करून परळीस येऊन समाधीचें दर्शन घेऊन तेथें पूजा अर्चा उत्साह ह्याचे बंदोबतास गांव वगैरे नेमून दिले. व चाफळचे उत्साहाचा बंदोबस्त करून पनाळ्यास स्वारी पावली. तेथून राजापूर प्रांतीं गेलियावर तेथेंच कांहीं दिवस राहिले. ते समयी गोंव्याचें राज कारण आलें. तें सिद्ध करून खासाच फौजबंदी, पायलोक करून, समुद्रास भरतें न आलें तों समय नेमला. ते वेळेस जाऊन पोहोंचावें. डांक ठेऊन जावेंसें सिद्धांत करून स्वारी केली. महाराजांनीं डाक चौकीचे लोक ठेऊन त्वरें करून पाठवावे ऐसा बेत केला. तैसेंच निघोन जातां वाटेस मदनगडचीं पत्रें बातमीचीं आलीं. ते समयीं लिहिणार कोणी आहे नाहीं विचारिलें. तों खंडो बल्लाळ यांणीं महाराज कृपा करीत तों पायउतारा स्वारी बरोबर असावें, ऐसें वृत्त केलें होतें. तसेंच पायउतारा पाठीमागें जात होते. तों लोकांनीं सांगितलें कीं, खंडोबा चिटणीस धांवत येत आहेत. ते समयीं हांक मारविली. तों धावून येऊन पावले. त्यांस जाब लेहून देणें [ असें ] सांगितलें. तों बसोन लेहून दिल्हे. स्वारी पुढें गेली. पुन्हा धावून निशाँण करून दिल्हे. तों रक्त ओकले. [ तें ] पाहून ऑस्ताव्यांतून पाणी देववून खासा घोडा जिलेबीस होता तो देऊन बसा म्हणोन सांगितलें. गोंव्या नजीक गेलियावरि पालखींतून उतरून घोडीवर स्वार जाले.

---

६६. समाधि—रामदास स्वामींचा.

६७. 'शिणाव' सातारा प्रत. निशाण=शिक्का, मोर्तब. नवव्या पृष्ठाचे आरंभापासून मजकूर खुद्द चिटणीस यांजकडील प्रतींतून मुख्यतः घेतला आहे. ही प्रत सातारकर महाराजांच्या चिटणिसांचे वंशज म्हणजे बखर रचणार मल्हार रामराव यांचे नातु रा० रा० खंडेरावजी चिटणीस यांणी आह्मीं मागितल्यावरून आम्हांकडे पाठविली याबद्दल आह्मीं त्यांचे फार आभारी आहों. ह्या प्रतीविषयीं विशेष हकीगत पुढें देऊं. चिटणिसांचें हें वर्तन आमच्या इतर जुन्या घराण्यांतील गृहस्थांनीं ध्यानांत घेण्या जोगें आहे.

६८. अस्तावा=झारी, लोटी. 'अस्तावा नाम भृंगारी' राजव्यवहारकोश.

६९. जिलीब—लवाजमा.

आणि निकडीनें जाऊन आटोपावें म्हणून पोहोंचले. तो त्या अवसरीं भरतें प्राप्त जालें. फिरंगी सावध होऊन उभे राहिले. लढाई पडली. फिरंगी मोडिला. लोक फार मारिले असतां पळून गोंव्याचे किल्यांत गेले. महाराजांनीं खासा घोडिया वरून जिनास पाणी लागे तों घोडा घातला. त्यांजबराबर खंडो बल्लाळ याणीं घोडा घालून तरवार मारिली. शिपायगिरी केली. गोंवेकर सावध जाले. पाणी चढलें तेव्हां माघारे फिरले. तों घोडा पहुणीस लागला. खंडो बल्लाळ यांणीं उडी टाकून महाराजांचा घोडा धरून पोहून बाहेर निघाले. ते समयीं बहुत संतोष होऊन पोंटाशीं धरिले आणि बोलिले जे, " तुझे वडील निरापराधें लुच्यांचे सांगण्यावरून विचार न करितां मारिले असतां आज चाकरीची शर्त केली. तुझी चिटणीशी महाराजांनीं वंशपरंपरें करून दिल्ही, निसबतीचे धंदे कारखानिशा जमानिशा ते बहाल आहेत. कैलासवासी महाराज तुमचे वडिलावरि प्रीति व विश्वास ठेऊन [ काम ] करीत होते तें पाहिलें आहे. त्याहून अधिक तुम्हांवर प्रीति, विश्वास ठेऊन चालवीन. कुलीन खरे." ऐसें नांवाजून " आमचे वंशींचा असेल तो परंपरेनें तिन्ही धंदे चालवील " ऐसें पुन्हा आश्वासन देऊन घोडा बक्षीस दिला. खांसा उतारपोशाख[७०] व मोत्यांची कंठी व तुरा दिला. स्वारी माघारी आलियावरि पालखी बहुमान देऊन गौरव करून मुतालीकें[७१] लिहिणार बोलावून " यांचे आज्ञेत सांगतील तसें चालावें, तेरीखें[७२] व पत्रें यांचे सांगण्याखेरीज लेहूं नये " ऐसें सांगितलें. वरकड लोकही बराबरचे यांणीं कामें काजें केलीं, तरवारा मारिल्या, व पाण्यांत उड्या टाकिल्या त्यांस बक्षिसें दिल्हीं. तैनाताही वाढविल्या. महाराज संगमेश्वरींच रहाते जाले[७३].

[ पुढें ] दिवसेंदिवस कबजीचे स्वाधीन अधिकच होत चालले. इतबार मनसबा सर्व त्याचेच स्वाधीन. कोणीही पुरातन राज्यांतील इतबारी त्याची प्रतिष्ठा, अथवा मसलतींत घ्यावा, हे गोष्ट राहिली. उग्रपणें शासन कोण्ही वर्णविचार न करितां शिरच्छेद करावा. ऐसें करीत चालले. कबजीचे सहवासें त्याचें वाममार्ग

---

७०. उतार पोशाख=अंगावर घातलेला पोषाख.

७१. मुतालीक=' उपमंत्री मुतालीको ' रा० व्य० को०. बाळाजी आवजी चिटणिसास मारिल्यापासून चिटणिशीचा कारभार मुतालिकांच्या मार्फत होत असे असें दिसतें. त्या मुतालिकांस आतां चिटणिसांच्या हुकुमांत वागण्यास आज्ञा झाली.

७२. तेरीख=तारीख=मिती. तारीख घालणें किंवा पत्र संपविणें हें खुद्द अधिकारी करीत.

७३. गोव्यावरील. स्वारी--इ० स० १६८३।८४ गोंवेकरांची खोड मोडण्याकरितां संभाजीनें पुष्कळ प्रयत्न केले; तथापि जरी त्याला कधीं कधीं जय येई तरी शेवटीं ते सर्व फुकट गेले.

कर्म तेणेंकरून फारच विचार राहिला नाहीं. माणूसमात्र फारच त्रास पावते जाले. सर्व प्रजेचीही क्षोभता जाली. न्यायाची रीत राहिली नाहीं. देव ब्राह्मणाचे ठायींही निष्ठा राहिली नाहीं. असें आचरण धरिलें. एक कबजी सांगितील तें प्रमाण. दैवयोगें करून होणार काल प्राप्त झाला. त्या योगें दुसरें सुचूं नये याप्रमाणें जालें. मैंतबर व बुद्धिवंत व शूर होते ते हतवीर्य जाले. महाराजांनीं नूतन पराक्रम करावा, नवें राज्य साधन करावें, हें राहिलें नाहीं. सुभेदार प्रांतांतील वगैरे; तैसेच गडकिल्ले यांचे कारभारी, यांजवरि हा कारभारांत खातो म्हणून चुगली करितांच त्याचा विचार न करितां त्यास आणावा, मारावा, नागवावा. अंतरेंच[७४] असलिया शिरच्छेद करावा. या भयें करून मातबर चार होते ते कोण्ही जवळ बोलूं न पावत. त्यांस आपली आपलीच अबरू प्रतिष्ठा जतन होणें हेंच येऊन पडलें. एक कबजीचें सांगणें मात्र प्रमाण. त्या नादें महाराज चालणार. त्यासच अनुमोदन देणें. मग विचार कळलाच आहे. तँजकरे[७५] घ्यावे, घरें बुडवावीं, नागवावें. माणूस राज्यांत वाढले ते कांहीं परराज्यांतून आणून वाढविले ऐसें घडत नाहीं. ऐशीं राज्यक्षयाचीं लक्षणें होत चाललीं. राज्य क्षयास जाणार त्या योगें [ असें ] घडत चाललें. वडिलोपार्जित सेवकांच्या प्रतिष्ठा राहिल्या नाहींत. सर्वही लघु मनुष्यें वृद्धिंगत जालीं. राज्यांतील सर्व कारभारी किल्ले सुभे यांणीं रोजमरा वाटणें इत्यादिक बारीक मोठी वर्तणूक करणें ते आज्ञा नेऊन करावी, तसें चालावें, हे थोरल्या महाराजांनीं रीत घातली. बंदोबस्त हुकुमाशिवाय काडी न हालावी असें केलें होतें. त्या चालीनें सर्व जागजागांचीं लिहिलीं यावीं. ते समयीं सर्वाध्यक्ष कबजी आति प्रीति त्यांणीं इतका कारभार कोठवर करावा ऐसें म्हणावें. व त्यास 'छंदोगामात्य कवि कलश पंडितराव' ऐसा किताब दिल्हा. तेव्हां सर्व आला कारभार, त्यांजकडे जा म्हणावें. बाँवानीं[७६] कागद पहाणें केलेलेंच आहे, तथापि लिहिणार इतके काय म्हणून लिहितात, यांत काय आहे, हंशील कलम ल्याहावें, तें चराठीं कशास लिहितात व चंदीपर्यंत किल्ले घेऊन काय समजोन करणारांनीं केले कळत नाहीं. किल्याचा बोभाट यावा. गनिमांनीं वेढा घालावा. त्याचें वर्तमान येथें येऊन पोहोंचून उँपराळा[७७] जावा तों तो किल्ला जावा. लोक मारले जावे. हें पातक किती घडतें, व दुर्लौकिक मोठा होतो कीं नाहीं. राज्य आंगठीचे ठिँकडे[७८] असें आस पास असावें. पहातां सर्व ध्यानांत येत असावें. म्हणजे

---

* मातबर=थोर, कुलीन, श्रीमंत.

७४. अंतर=सेवेंत, निष्ठेंत अंतर; कसुरी–फितुरी.

७५. तजकरा–लुच्चेगिरीनें दुसऱ्याचें वित्त हरण करणें, परवित्तापहार.

७६. बावा=कबजी.

७७. उपराळा=मदत, सुटका करण्याकरितां सैन्य.

७८. आंगठिचें ठिकडें–अंगठीचा खडा

उपराळाही होतो. बंदोबस्त यथास्थित राहतो. सेवक मर्यादेनें चालतात. असे अनेक प्रकारें कल्पना कराव्या. बोलावें. त्यांस महाजांनीं ऐकावें [ हें ] त्याचें दैव ! ब्राह्मण लँघु असतां योग्यता आली तेव्हां त्यास तर्क व कर्तेपणा बुद्धि कोठील कळतच आहे. राजे तरि त्याचे स्वाधीनच वश जाले. राज्यभ्रष्ट होणार. तेणेंकरून कांहीं सुचतें न झालें थोर थोर ज्यांणीं राज्याविशीं पराक्रम केले, राज्य वृद्धीस नेलें व शूर पराक्रमी यांणींही ऐकावें, आचरण सकल पहावें, आणि म्हणावें कीं, "देवांनीं आम्हांस कां ठेविलें ? कैलास वास महाराजांनीं केला त्या अगोदर मेलों असतों, अगर महाराजांनीं सर्व मारिले यांत मारिलें असतें तरी उत्तम होतें, परंतु असे दिवशीं हें पहाणें अनुचित. ज्याचें अन्न बहुत दिवस खादलें व या राज्यांत वाढलों, लौकिक मेळविला, तें व्यर्थ जिणें ऐसें घडलें. महाराजांचें अकल्याण होतें. आम्हांत पराक्रम बुद्धि असून व्यर्थ झाली." ऐसे बहुत श्रमँ करून " होणें तें होईल, पहाणें प्राप्त; उगेच असावें." ऐसे सर्व करिते जाले. सर्वही हतवीर्य होऊन कांहींएक न बोलतां राहते जाले. पागा हत्ती सर्व कारखाने फौज जिकडील तिकडे बेनिगेनें[८१] बुडाले, मेले, गेले. फौजेचा दरकार नाहीं बुडाली. लोक नामी, माणसें कर्तीं चहूंकडे चार गेलीं. पिलाजी शिर्के व तानाजी शिर्के, गणोजी शिर्के हे महाराजांचे आप्त. याणीं राजा वेडा जाला, कबजीनें वश केलें, राज्य बुडतें, त्या अर्थीं हिय्या करून शिवाजी[८२] राजे शिर्के यांचे भाचे यांस घेऊन राज्यावर बसवावें. राजाराम काढून त्याचे हातें कारभार चालवून राज्य रक्षावें. ऐसें राजकारण केलें. तें संभाजी महराज यांस समजलें. फुटलें. आधींच क्रूर मर्जी, यांत याजपासून अंतर ऐसें समजलें तेव्हां इतराजी केली. घरीं जप्ती पाठविली. [घरें] लुटलीं, जाळलीं. एक दोन शिर्के सांपडले ते मारिले. शिर्के जेथें असतील तितके मारावें ऐशी आज्ञा करून शिर्कैाण[८३] करविलें. ते समयीं दौलतराव शिर्के गणोजी व देवजी शिर्के वगैरे पळोन सर्व शिर्के तितके कुटुंब सुद्धां हबसाणांत गेले. चहूंकडे चार जाऊन मोगलाईंत जाऊन चाकऱ्या करूं लागले.

[इकडे] औरंगजेब भागानगर घेऊँन[८४] तेथील [तानाशहा] पातशहा कैद केले. कैदेंत असतां एके दिवशीं त्यांणीं मध्य रात्रीचे ठायीं चौघड्याचे वाजंत्री याणीं राग गाइला तो [ऐकून] बहुत खूष होऊन लाख रुपये बक्षीस त्यास द्यावे म्हणून सांगितलें.

---

७९. 'भिकारी' सा० प्र०.

८०. श्रम=दुःख, खेद.

८१. बेनिगा=अपरक्षण.

८२. शिवाजी राजे=संभाजीचा मुलगा शाहू.

८३. शिरकाण=शिरक्यांचा नाइनाट, समूळ उच्छेद. (?)

८४. गोंवळकोंड्याचें राज्य स० इ० १६८७ त घेतलें.

# भूगोल-वर्णन.

आत्मा हेमें[1] जसें तसा स्थिर-चरीं नाना नगीं[2] संचला ।
हें नेणें नुसतें सुवर्ण वळखें आत्मत्व तो वंचळा[3] ॥
एवं जो भगवंत विश्व अवघें वंदूनियां त्यास मी ।
हा भूगोल-तरंग[4] वर्णित असें त्या चित्समुद्रीं समीं ॥ १ ॥
सहस्र-पत्राब्जें[5] तशी धरा हे । तत्कर्णिका[6] होउनि मेरु राहे ॥
द्वीपां[7]चिया सिंधुचिया जळाच्या । पंक्ती तयाच्याच जशा दळाच्या ॥ २ ॥
कोटापुढें खंदक खंदकाही । पुढें दुजा कोट चि जेंवि कांहीं ॥
द्वीपापुढें सागर सागरासी । द्वीप,क्रमें त्यास हि वारिराशी[8] ॥ ३ ॥
अशी योजनें भूमि पन्नास कोटी[9] । मधें मंडळाकार हे मध्य कोटी ॥
पुढें कंकणाकार सर्वा धरा हो । तसे सिंधु ही हा मनीं बोध राहो ॥ ४ ॥
अशी सप्तद्वीप[10] क्षितिवरि मधें त्यांत मिरवे ।
वरी जंबुद्वीपें क्षिति नवचि ते भाग बरवे ॥
तयामध्यें मेरू तळिंहुनि हि जो रुंद वरता ।
उभा [11]गांवें लक्षप्रमित म्हणती वेदें[12] पुरता ॥ ५ ॥

**ओव्या**—मेरूस दक्षिण दिशे । निषधनाम पर्वत असे ॥
नीलाद्रि उत्तरे वसे । माल्यवान पश्चिमेसी ॥ ६ ॥
पूर्वेसी गंधमादन । समुद्र पर्यंत या पासून ॥
भूमी भद्राश्व म्हणून । म्हणवी खंड ॥ ७ ॥
पश्चिमे माल्यवान् पर्वत । त्या पासून समुद्रपर्यंत ॥
केतुमाल म्हणोनी विख्यात । तिसरें खंड ॥ ८ ॥
पूर्वपश्चिम समुद्रवरी । तीन खंडें या परी ॥
इलावृत्त चहूंकडे चारी । सीमा-पर्वत ॥ ९ ॥
त्यास दक्षिणेस निषध-गिरी । पूर्वपश्चिम समुद्रवरी ॥
दक्षिणे जातां आडवा परी । पूर्व पश्चिम तो नीट ॥ १० ॥

---

१. हेम=सोनें. २ नग=दागिना. ३ वंचला=फसला. ४ तरंग=लाट. ५ अब्ज=कमल. ६ कर्णिका=मधला भाग. ७ द्वीप=बेट. ८ वारिराशी=समुद्र. ९ अर्वाचीन शोधान्वयें पृथ्वीचा व्यास ८००० मैल ह्मणजे ८०० योजनें, परीघ २५००० मैल ह्म० २५०० योजनें, व क्षेत्रफळ २०,००,००,००० कोटी मैल ह्मणजे २,००,००,००० दोन कोटि योजनें आहे. १० सप्तद्वीपें=जंबूप्लक्षाह्वयौ द्वीपौ शाल्मलीश्चापरोद्विज । कुशः क्रौंच स्तथा शाकः पुष्करश्चैव सप्तमः ॥ १ ॥ ( विष्णुपुराण ). ११. गांव=योजन १२ वेद=चार.

त्यास ही दक्षिण दिशे । हेमकूटें[13] पर्वत असे ॥
या दोहींमध्यें खंड वसे । हरिवर्ष म्हणूनी ॥ ११ ॥
हेमकूट पुढें पर्वत । दक्षिणेस उभय सिंधू पर्यंत ॥
या दोंगिरींमध्यें विख्यात । किंपुरुष खंड ॥ १२ ॥
हिमाचल दक्षिण दिशे । समुद्रवरी पृथ्वी असे ॥
तिथें हें भरत-खंड वसे । कर्मभूमी ॥ १३ ॥
एवं पूर्वपश्चिम दोन्ही । मध्यें एक दक्षिण तिन्ही ॥
मेरू भोंवतीं खंडें नेमूनी । सांगितलीं साहा च ॥ १४ ॥
आतां मेरू भोंवतें इलावृत्त । त्यास उत्तरे नीलपर्वत ॥
त्या ही पुढें नामें श्वेत । गिरी आडवा उत्तरे ॥ १५ ॥
या दों पर्वतांभीतरीं । पूर्वपश्चिम समुद्र वरी ॥
रम्यक् खंड तया [14] वैखरी । बोले मुनीची ॥ १६ ॥
यास ही उत्तर दिशे । शृंगवान् पर्वत तैसाच असे ॥
तेथ पर्यंत वसे । हिरण्यमय खंड ॥ १७ ॥
तेथून उत्तरे समुद्र वरी । उत्तर-कुरु-खंड या परी ॥
एवं नवखंड कूसरी । जंबुद्वीपाची ॥ १८ ॥

**श्लोक**—मधें मेरु त्या भोंवति भू अखंड । गिरी चौंत दावी इलावृत्त खंड ॥
तया मध्यखंडास जे पूर्व भागीं । तया नाम भद्राश्व पृथ्वी विभागीं ॥ १९ ॥
इलावृताहूनि हि पूर्व भागीं । तें खंड भद्राश्व धराविभागीं ॥
जें पश्चिमे तें तरि केतुमाला । या दोंस ही सागर-युग्म-माळा ॥ २० ॥

**घनाक्षरी**-लोक आतल वितळ । तया तळीं ही सुतळ ॥
तळातळ महातळ । एक एका खालते ॥ १ ॥
तया खालें रसातळ । तया खालें ही पाताळ ॥
तया तळीं महा [15] व्याळ । व्यास-वाणी बोलते ॥ २ ॥
भूमीवरी भुवर्लोक । स्वर्गीवरी महर्लोक ॥
जन-तप-सत्य-लोक । एक एका वरते ॥ ३ ॥
ब्रह्मांड हें विवरण । वरी वरी आवरण ॥
पुढें वामन-चरण । सत्व तेंची उरतें ॥ ४ ॥ २१
कोटि योजन पन्नास । अंड कोटीचा विन्यास ॥
सांगितलासे धन्यास । राजयासी श्रीशुकें ॥ १ ॥

---

१३ कुट=शिखर. १४ वैखरी=वाणी. १५ व्याळ=शेष.

मध्यें भूगोलाचें स्थळ । मेरु[16] सोन्याचा अढळ ॥
तया भोंवतें अचळ । असंख्यात कौतुकें ॥ २ ॥
कार्णिका सहस्र-दळीं । तसा मेरू भूमंडळीं ॥
जैशा केशराच्या वळी । हेमगिरी-शतकें ॥ ३ ॥
मेरू भोंवतें भूतळ । जैसें वर्तुळ कमळ ॥
जंबुद्वीप तें केवळ । लांब रुंद तितुकें ॥ ४ ॥ २२
लक्ष योजनें विशाळ । मेरू सोन्याचा सुढाळ ॥
जंबुद्वीप भूमी माळ । भोंवती त्या पर्वत ॥ १ ॥
सोळा सहस्र योजन मेरू । भूमींत निमग्न जैसें धत्तुरू[17]
सुमन रुंद जों जों वरू । .. .. .. .. ॥ २ ॥
तया भोंवती ते धरा । तो ची जंबुद्वीप खरा ॥
लांबी रुंदीनें जो बारा । लक्ष गांव पुरता ॥ ३
तया वेष्टण कंकण । सिंधु नामें जो लवण ॥
स्वयें वर्तुळ आपण । लक्ष गांव पुरता ॥ ४ ॥ २३
जंबुद्वीप हा अखंड । नद्या पर्वत उदंड ॥
त्या ही मध्यें नव खंड भूमंडळ वर्णिती ॥ १
मध्यें मेरू हा पर्वत । तेथें खंड इलावृत्त ॥
दोन्ही समुद्र पर्यंत । दोन्हीकडे असती ॥ २
तीन खंडें दक्षिणेस । तीन खंडें उत्तरेस ॥
शेवटील दोन्ही जैशा । धुनुष्याच्या आकृती ॥ ३
सिंधू उत्तर दक्षिण । दोन्ही धनुष्य लक्षण ॥
सीमा पर्वतांचे गण । दोहीं अंतीं ये रिती ॥ ४ ॥ २४
सिंधु नामें जो लवण । पूर्व पाश्चिम दक्षिण ॥
हिमाचल तो आपण । गिरिराज उत्तरे ॥ १ ॥
तें हें भरताचें खंड[18] । पुण्य सद्गति उदंड ॥
येथें पापी लंड भंड । ते ची नरकी खरे ॥ २
एथें करिती जे पाप । तयां नरकीं संताप ॥
जो जो पुण्याचा प्रताप । तो तो लोक ही बरे ॥ ३

---

१६ मेरु—भास्कराचार्यादि ज्योतिषी पृथ्वीच्या आंसाला मेरु ह्मणतात. १७. धतुरु=धोतऱ्याचें फूल. १८ भरतखंडाच्या सीमा लघु आर्य सिद्धांतांत एथल्या प्रमाणेंच वर्णिल्या आहेत:—सागर-हिमगिरिमध्ये चापाकारं हि भारतंवर्षम.

एथील ची पुण्यफळ । द्वीपें खंडें हें सकळ ॥
स्वर्ग अतळ वितळ । तेथूनी च हे सारे ॥ ४ ॥ २५

चित्त-शुद्धीनें चिद्भक्ति । हरिभक्तीनें विरक्ती ॥
भक्ति-विरक्तीनें मुक्ती । ऐशीं शास्त्रें बोलती ॥ १ ॥
पाकें[19] ज्ञानाचा न ज्यास । सत्य लोकीं तया वास ॥
तेथें करूनी अभ्यास । अंतीं मोक्ष पावती ॥ २
मोक्ष अन्यत्र ही परी । तेथें ज्ञान होय जरी ॥
मोक्ष-प्रदत्व ही तरी । यात्र खंडीं साधितो ॥ ३
ज्ञानें वीण चित्तशुद्धी । तेणें जन्मांतरीं सिद्धी ॥
आत्मतत्व ज्ञान-बुद्धी । या च भूमी वरितो ॥ ४ ॥ २६

लक्ष योजनें समुद्र । खोल तितका च रुंद ॥
लंकादिक दुर्गवृंदें[20] । त्याचि मध्यें वर्णिती ॥ १ ॥
पुढें द्वीप नामें लक्ष । तेथें प्लक्षनामें लक्ष ॥
रुंदीनें तो दोन लक्ष । लांब कवणाकृती ॥ २
रस उंसाचा केवळ । तैसें सागराचें जळ ॥
त्यानें द्वीप तें केवळ । वेष्टिलें हो बोलती ॥ ३
पुढें शाल्मली म्हणून । वृक्ष नामेंची करून ॥
द्वीप तयाचें वेष्टन । मद्य-सागर असे ॥ ४ ॥ २७

त्या ही पुढें कुशद्वीप । कुशस्तंभ जेंवि दीप ॥
ऐसें तेज तो अधीप । जाणों द्वीपांचा दिसे ॥ १
घृत-सिंधूचें वेष्टण । त्याही पुढें विचक्षण ॥
क्रौंच द्वीपाचें लक्षण । बोलताति हो असें ॥ २
ज्यांत क्रौंच डोंगर । घेरा क्षीराचा सागर ॥
जया क्षीराब्धींत वर । त्याचे कन्येचा असे ॥ ३
क्षीरनिधीपुढें धाम । शाकद्वीप त्याचें नाम ॥
शाकवृक्ष अभिराम । त्याचें नाम त्या प्रती ॥ ४ ॥ २८

त्या ही भोंवता तो अब्धी । त्याचें पाणी जाणों दधी ॥
पुढें द्वीप तें अवधी । सातवें हें बोलती ॥ १
तया वेष्टण जें जळ । गोड सिंधूचें केवळ ॥
त्या ही पुढें तो अचळ । लोकालोक येरीतो ॥ २

---

१९ पाक=परिणाम, फळ. २० वृंद=समूह.

अनुक्रमणिका

कीं ज्या [21] भीतरी हे लोक । जया बाहेरी आलोकें[22] ॥
सूर्यचंद्र अवलोक[23] । जयापुढें नसती ॥ ३
ब्रह्मांडाचा मध्य भाग । भूमी त्याचा हा विभाग ॥
जिला शिरीं शेष नाग । अहर्निशीं वाहातो ॥ ४ ॥ २९
वरी वरी सत्य लोक । ब्रम्ह-पद जें विशोक ॥
लेखितां तें सत्यलोक । कटाहा[24] ची राहतो ॥ १ ॥
अंड-कटाहाचें दळ । कोश दशगुण जळ ॥
दशगुण ची अनळ । वायुपुढें वहातसे ॥ २ ॥
नभ अहं महत्तत्व । दशा दशगुणकत्व ॥
साक्षी पुढे निर्गुणत्व । वामन हें पाहातो ॥ ३ ॥ ३०

समाप्त.

---

## रसना[25]-स्तुति.

### सवाया.

पांडव-भाग्य सहस्रमुखास[26] हि वाच्य नव्हे न धरे अनुमाना
जें महा थोर पितामहँ[27]-वैभव त्याहुनि ही अति उत्तम माना ॥
कोटि चतुर्दश निर्मुनियां विधि पात्र न ज्या पुरुषोत्तम-माना ।
तो हरि भाइ रे भाइ म्हणोनि थापटि पार्थ-तुरंगमें[28] माना ॥ १ ॥
हे रसने तुज वीनवितों कर जोडुनि एक विनंति करीं ।
सर्व अमान्य जगत्रय दुर्गुण काढुनि होउं नको अखरी ॥
मौन्य-रूपें क्रमुं काळ कसा म्हणसी तरि निश्चळ ध्यान धरीं ।
श्रीशिव शंभु दयार्णव केशव माधव कृष्ण मुकुंद हरी ॥ २ ॥
हे रसने तुज सांगितलें हित काज हरि-स्मरण शिकावें ।
श्रोत्र-युगीं श्रवणादि करूनि कथामृत-सार मनांत धरावें ॥
हस्तकिं पूजन मस्तकिं वंदन नेत्रिं विलोकुन रूप भरावें ।
ईश्वर हे समबुद्धि निरक्षुनि मानुं नको मग आपपरावें ॥ ३ ॥

समाप्त.

---

२१ भीतरी=आंत. २२ आलोक=प्रकाश. २३ अवलोक=पहाणें. २४ कटाह=कढई. २५ रसना=जीभ. २६ सहस्रमुख=शेष. २७ पितामह=ब्रह्मा, भीष्म. २८ तुरंगम=घोडे.

## कंस-वध.

### घनाक्षरी.

बजाहुनी ही अभंग । मल्लां वाटला श्रीरंग ॥
नरां नरनाथ रंग । भूमी येतां वाटला ॥ १ ॥
वाटे नारींसी मदन । नंदादिकांसी स्वजन ॥
दुष्ट रायांसी शासन । धाकें ऊर फाटला ॥ २ ॥
मायबापां तान्हें बाळ । भयें कंसा वाटे काळ ॥
मूढां वाटे फ़टकाळ । शोकें कंठ दाटला ॥ ३ ॥
स्वात्म योगियां स्वरूप । यादवांसी विष्णु-रूप ॥
दृष्टी देखतां अरूप । दुःखसिंधु आटला ॥ ४ ॥ १ ॥

संगें गडी बळीराम । रंगा येता मेघश्याम ॥
कुवलयापीड नाम । द्वारीं गज देखिला ॥ १ ॥
पीतांबरें कसी कास । शिरीं बांधी अलकांसे[29] ॥
दावी वीरकौतुकास । वीर-रसें रेखिला ॥ २ ॥
कृष्ण उचलुनी हात । म्हणे अरेरे महात ॥
जाणें रायाचे गृहांत । वाट सोडीं वहिलीं[30] ॥ ३ ॥
नाहीं तरी हा वारण[31] । तुज सहीत मरण ॥
पावेल हा अजी रण-रंगीं जय पाहिला ॥ ४ ॥ २ ॥

सोंडेचा सांखळदंड । उचलुनी शुंडा दंड ॥
कुवलयापीड चंड । वेगें करी[32] लोटला ॥ १ ॥
शृंखळा ते खळखळ । वाजे लोहाचे निःखळ ॥
यमें कवळीला खळ । खुळगासा[33] उठिला ॥ २ ॥
घंटा जड मण मण । वाजताती घण घण ॥
मक्षिकांची खण खण । मध्यें जेव्हां धांविला ॥ ३ ॥
ऐसा करी हरी हरी । संहारी हो हरी हरी ॥
केशरी[34] हो कोण सरी । श्रीहरी चपळ पावला ॥ ४ ॥ ३ ॥

सोंडेचा सांखळ-दंड । चुकवूनी भुजदंड ॥
हाणे हस्तीसी प्रचंड । निघे चहूं चरणीं ॥ १ ॥

---

२९. अलक=केस. ३० वहिला=तत्काळ. ३१ वारण=हत्ती. ३२ करी=हत्ती. ३३ खुळगा=रेडा. ३४ केसरी=सिंह.

पुच्छीं धरी गिरीधरें[३५] । मार्गे ओढी फरफर ॥
हत्ती हगे भर भर । चित्रितें[३६] करणी ॥ २ ॥
पुढें येऊनी अनंत । कुवलयापीड दंत ॥
चुकवितात अत्यंत । धासती हो धरणी ॥ ३ ॥
ऐसा मारूनी द्विरदें[३७] । उपडूनी दोन्ही रदें[३८] ॥
शोणितें[३९] वरद । रंगला हो त्या रणीं ॥ ४ ॥ †

समाप्त.

---

## ब्रह्मबोध. *

शुक म्हणत नृपाळा आयकें कर्णवापी ।
भरुनि रस निघे जो तो चि आकर्ण वा पी ॥
जग गुरु परमात्मा जो चिदानंद सारे ।
लव गुण कथिल्यानें त्यांत आनंद सारे ॥ १ ॥
करुनि सावध चित हृदंबुजीं । श्रवण तूं करिं सौख्यदयांबु जी ॥
जग भवांत भुजंगमें[४०] भासतो । मग दिसे हरि रज्जु चि भास तो ॥ २ ॥
ऋषि समस्त मुखीं हरि दुंदुभी । पुसत त्यास चि आनक दुंदुभी[४१] ॥
तुम्हि समस्त समाधि-सुखीं हरी । स्तवितसां भव भ्रांतिक जो हरी ॥ ३ ॥
तुम्ही ब्रह्म ध्यातां निजानंदरूपी । समाधिस्त होऊनियां चित्स्वरूपीं ॥
असे ब्रह्म तें काय कोठें वसे जें । मम ज्ञान कीं चंद्र आमावसे जे ॥४॥
म्हणे मी अज्ञानी मज निबिड अंधार रजनीं
जनीं ब्रह्मातें या न कळत असे काळ भजनीं ।
तुम्हां सर्वज्ञांतें म्हणुनि पुसतों सत्व हृदया
दयाळुत्वें ब्रह्मार्पण कथन सांगा स्वहृदया ॥ ५ ॥
स्तवितसे **वसुदेव** कृतांजली । करुनि वंदन लोचन सज्जळीं ॥
नयनिं घालुनि ब्रह्म निरंजना । तुम्हि समस्त करा नयनांजना ॥ ६ ॥
या शून्य गेह हृदयीं दिप ऊजळाया ।
मोहांधकार भव लोचनिं काजळा या ॥

---

† हें प्रकरण अपुरतेंच आमच्याकडे आलें होतें.

* हें प्रकरण वामनाचें ह्मणून आम्हांकडे आलें परंतु याचे शेवटचे श्लोकांत " नरहरी " असें नांव आहे यावरुन हें वामनी नसावेंसें वाटतें. भाषाही वामनी भाषेहून अधिक खडबडीत आहे.

३५ गिरिधर=कृष्ण. ३६ चित्रित=चमत्कारिक. ३७ द्विरद=हत्ती. ३८ रद=दांत. ३९ शोणित=रक्त. ४०. भुजग=सर्प. ४१ आनकदुंदुभी=वसुदेव.

वाटे प्रकाशकर तूंच तुम्हांविना ही
चिद्रूप दीप उजळीं सम अन्य नाहीं ॥ ७ ॥
ऐकोनिगां मुनिवरें वसुदेव वाणी[४२] । जो ब्रह्म सेवीनि नसे स्वसुखामि वाणी[४३] ॥
ते बोलती तव गृहीं हरि ब्रह्म आहे । ऐसें असोनि तुज कां भवबंध आहे ॥ ८ ॥
तूझी प्रिया गुण वधू सति **देवकी** जे । गर्भांत ब्रह्मरूप वसति [?] देव कीजे ॥
तें प्राप्त ब्रह्म तुजला वसुदेव कीजे । लौकीक वृत्ति तपिनां वसुदेव कीजे ॥ ९ ॥
ज्ञानांजनें करूनियां वसु ब्रह्म पाहे । जें शोधितां तव गृहींच करी कृपा हे ॥
त्या निर्गुणा गुणमयी जन आंत राया । राहे स्नुषा म्हणाति ते हरि दुस्तराया ॥१०॥
सकळ व्यापुनियां सचराचरीं । अननरे जयि ब्रह्म चराचरीं ॥
भुजग हे जग सर्व विती सती । तव गृहीं तनुज रुक्मिणि दीसती ॥ ११ ॥
हरी रुक्म[४४] विश्वीं अळंकार सारे । हरी रुक्म हें रुक्मिणि हार सारे ॥
हरि ब्रह्म माया घटीं बिंब राजे । तदंशें जिणें निर्मिले देवराजे ॥ १२ ॥
जमें चिदानंदरूप साचें । जें देवकीच्या उदरांत साचे ॥
सर्वस्व आम्ही भजतां तयातें । तें तारितें पाप-भवानगातें ॥ १३ ॥
ते सर्व सांगाति तया वसुदेव राया । कीं ब्रह्म निर्मित असे तुझिया घरा या ॥
ध्यानस्थ जे गुण कथूं तव नंदनाचे । जो गोकुळीं हरिस घेउनि नंद नाचे ॥१४॥
हा सर्व रज्जु भुजगा स्थिर जंगमाचा । जो गर्व नाशित जळांत भुजंगमाचा ॥
तो हें खरें जग समस्त तरंग सारें । या कारणें हरिगुणामृति रंग सारें ॥ १५ ॥
ऋषि-मुखीं निघतां अशि वैखरी[४५] । यदुवरा गमली कथिनी खरी ॥
करुनि वंदन सत्वर तो निघे । हरिगुणामृत नाम निघोनि घे ॥ १६ ॥
तदुपरि वसुदेवें येउनीयां घरातें । हरिस सदय भावें हें पुसे आग्रहातें ॥
सगुण रूप तुझें हें वाटसी ब्रह्म सारें । मम शिशु वदताती वृद्ध आबाल सारे ॥१७॥
ऋषीं तें मी प्रार्थीं तुम्हि सतत ब्रम्हात्मभजनीं ।
जनीं या राहोनी नलिनि दल भावें चि विजनी[४६] ॥
हरि ध्यातां ब्रम्हा त्यजुनि भववार्तांसि सकळां ।
कळा चिद्रूपाची मज हि तुम्हि सांगा अविकळा ॥ १८ ॥
ते सांगती मजप्रती सदनात्मभावी । कीं कृष्ण पुत्र असतां पडसी अभावीं ॥
ऐसें असोनि वद कां तुज मोह जाची । हे ब्रम्हमूर्ति असतां उदरीं अजाचीं ॥ १९ ॥
जें ब्रम्ह सर्वांतरिं आरसा रे । न सेवित प्रकृति आरसा रे ॥
लिंबे तयाच्या पद-सारसा रे । सेवीति त्या तुच्छ हि सार सारें ॥ २० ॥

४२ वाणी=भाषण. ४३ वाणी=कमताई. ४४ रुक्म=सोनें. ४५ वैखरी=वाणी. ४६ विजनी=एकांती.

ती शोभली फार महानदी सती जीच्या पुढें योग ल्हान दीसती ॥
चित्तीं म्हणें जे करितील मज्जनें[22] ते अन्यपापें हरितील मज्जनें[23] ॥ १९ ॥
असी कृष्णादेवी निजतनुभवा विश्वसुहिता ॥
दिली कृष्णें तीतें शतधृति[24] म्हणे हे स्वदुहिता ॥
तयाचा जो लोकप्रियहित मिळाला सुरस त्या ॥
बहु प्रेमें सर्वा करिति नुति[25] पूजा सुरसत्या[26] ॥ २० ॥
भाग्येंकरूनि भव्याची[27] ॥ मावली पावली मग ॥
ब्रम्हा रची श्रीहरिच्या ॥ उक्तिनें युक्तिनें जग ॥ २१ ॥
आर्या–जगदघहरें सुतीर्थें रचिलीं या निर्मिल्या जगीं विधिनें ॥
त्यावरि भूवरि कृष्णा तीर्था बा आणिली दयानिधिनें ॥ २२ ॥
जैसी सुरभि स्वर्गी विविधविषयभुक्तिदान दीनां दे ॥
या भूतळीं तदधिका हे कृष्णा मुक्तिदा नदी नांदे ॥ २३ ॥
इति श्रीकृष्णामाहात्म्ये द्वितीयोध्यायः

---

## अध्याय तिसरा.

श्लोक–जगत्पूज्या कृष्णा परम गुरुची मूर्ति सुसती ॥
तिच्या माहात्म्यातें मुनि नमुनियां पाय पुसती ॥
कृपावर्षे ज्याच्या भय तिळ न संसारदव दे ॥
महात्मा तो ऐसें करुनि करुणा नारद वदे ॥ १ ॥
या प्रश्नें तुमची मोठी ॥ माझी ही धन्यता पहा ॥
म्हणतील भवत्ताप ॥ हा नसे अन्य ताप हा ॥ २ ॥
आर्या–श्री कृष्णामाहात्म्यश्रवणेच्छा जेधवां मनीं झाली ॥
आली तुमच्या हस्तीं मुक्ति प्रेमें जसी प्रिया आली[28] ॥ ३ ॥
जेथें श्रीकृष्णेचें माहात्म्य श्रवण तो चि वरदेशें[29] ॥
सर्व मनोरथ पुरवी नुरवी कळिविघ्न विष्णु वरदेशें[30] ॥ ४ ॥
कृष्णेच्या भक्ताचा कोणाहि पुढें न हात पसरेल ॥
त्या परम सभाग्याचें कल्पांतीं हि न महातप सरेल ॥ ५ ॥
श्लोक–पक्षांचा ध्वनि ऐकतां चि हृदयीं जे पक्षिपाळा[31] अहि[32] ॥

---

२२ मज्जन=स्नान. २३ मज्जन=मत्+जन ( माझे जन=भक्त. ) २४ शतधृति=इंद्र. २५ नुति=स्तुति. २६ सुरसत्या=देवांगना. २७ भव्य=कल्याण. २८ आली=सखी. २९ वर-देश=श्रेष्ठ प्रांत. ३० वरदेश=वरद+ईश ( वर देणाऱ्यांत श्रेष्ठ ). ३१ पक्षिपाळ=गरुड. ३२ अहि=सर्प.

